मेजर अरविंद पाटील





# सागर संग्राम

कादंबरी

# सागरसंग्राम

मेजर अरविंद पाटील



प्रकाशक
प्रकाश कोठावळे
भागीदार, सूर्य प्रकाशन
१३२५/२१, ख, शिवाजी उद्यमनगर,
कोल्हापूर.

मुद्रक
प्र. य. कुलकर्णी
श्री रामनाथ मुद्रणालय
८५२/५, बी, सुभाष रोड
कोल्हापूर.

प्रकाशन क्रमांक दोन

प्रथमावृत्ती जुलै १९८५

मुखपृष्ठ
किरण नामजोशी
कोल्हापूर.

मुखपृष्ठ छपाई
के. जोशी आणि कंपनी
पुणे.



मूल्य रुपये वीस

पद्मश्री
मान. रत्नापाण्णा कुंभार
यांच्या विधायक
नेतृत्वशक्तीला
सादर समर्पण

# ॥ प्रकाशकीय ॥

'सागरसंग्राम' हे 'सूर्य प्रकाशन' चे द्वितीय पुष्प मराठी वाचकांना सादर करताना आनंद होत आहे. या कादंबरीचे लेखक श्री. अरविंद पाटील हे भारतीय लष्करात मेजरच्या हुद्यावर काम करत असून त्यांनी आतापर्यंत अनेक इंग्रजी पुस्तके लिहिलेली आहेत व ती सर्व प्रकाशितही झालेली आहेत. पण ती सर्व पुस्तके लष्करी विषयावर आहेत. मेजर पाटील यांची 'सागरसंग्राम' ही पहिलीच मराठी ललितकृती. ती प्रकाशित करण्याची सुसंधी 'सूर्य प्रकाशन' या नवोदित संस्थेला लाभत आहे. मेजर पाटील यांच्या समर्थ लेखणीतून अवतरलेले 'रक्ताश्रू' हे युद्ध कथांचे पुस्तक आणि रोमेलचे चरित्र इथून पुढच्या काळात वाचकांच्या भेटीस आणण्याचा आमचा मानस आहे

यापूर्वी 'सूर्य प्रकाशन' चे प्रथम पुष्प म्हणून श्री. विलास साळोखे लिखित 'घायाळ' कादंबरी आम्ही सादर केली. श्री. साळोखे यांच्या यापूर्वी प्रकाशित झालेल्या 'एका प्रियेची गोष्ट' 'नाती', 'मिथुन' या कादंबऱ्या व 'बिग' हा कथासंग्रह या पुस्तकांचे वाचकांनी जसे स्वागत केले तसेच 'घायाळ' चे करतील यात शंका नाही. श्री. विलास साळोखे यांची 'वचन दिले तू मला' ही प्रणयकादंबरी व 'दिवटा' हा विनोदी कथांचा संग्रह हीही आमची आगामी प्रकाशने राहातील.

या पुस्तकांबरोबरच काही नवोदित तसेच प्रथितयश साहित्यिकांचे वाङ्मय आणि त्याच बरोबर काही गाजलेल्या इंग्रजी पुस्तकांचे मराठी अनुवाद प्रकाशित करण्याची आमची योजना आहे.

या सर्व कार्यात सुजाण मराठी वाचकांचा कृपालोभ हा आमचा आधार राहील. आणि तो लाभण्यासाठी आम्ही पात्र राहावे असा आमचा प्रयत्न राहील.

प्रकाश कोठावळे

# ।। प्रास्ताविक ।।

शिकारी देवमासा– सागरामधला एक अत्यंत क्रूर आणि बलाढ्य सस्तन प्राणी ! सागरात वावरणाऱ्या प्रत्येक जलचराला त्याची भीती वाटते. पण शिकारी देवमाशालाही त्याच्या अस्तित्वासाठी झगडावे लागते– निसर्गाच्या आणि मानवाच्या शक्तिविरुद्ध !

ही अशाच एका शिकारी देवमाशाच्या सागरसंग्रामाची कथा आहे.

जेरेमी ल्यूकस या ब्रिटिश शास्त्रज्ञाचा 'सेबर द किलर व्हेल' हा ग्रंथ आणि क्लाइव्ह बर्टन या शास्त्रज्ञाचा 'द व्हेल्स' हा ग्रंथ, त्याच प्रमाणे नॅशनल जिऑग्राफिक मासिकाचे अंक या पुस्तकासाठी संदर्भ ग्रंथ म्हणून वापरले आहेत.

अरविंद पाटील

# संग्रामच्या सागरसंग्रामाचे क्षेत्र



## मेजर अरविंद पाटील यांचे अन्य प्रकाशित साहित्य

1. Babar, The First Moghul
2. The Korean War : 1950–53
3. General Douglas Mac Arthur
4. The American Civil War
5. The War In Bangladesh
6. Sadat of Egypt
7. Montgomery of Alamein




### आगामी

१. रक्ताश्रू ( युद्धकथा )

२. रोमेल ( चरित्र )

# ॥ एक ॥

निळयाशार सागराला प्रात:कालच्या अधिऱ्या पावलांची चाहूल नुकतीच लागली होती.

सागराच्या अवखळ लाटा खळाळत होत्या, फेसाळत होत्या. दूरवर पुसटपणे दिसणारा किनारा त्यांना मूक साद घालत होता. पहाटेच्या धूसर प्रकाशामधून त्या लाटा एका मागून एक किनाऱ्याकडे धावत होत्या.

पूर्वेला आकाश सागराच्या अफाट रेषेवर अलगदपणे विसावले होते. तिथे सोनेरी–तांबूस रंगाची अगदी खैरात झाली होती. पिंजारलेल्या ढगांचे पुंजके आकाशात विखुरले होते. ते त्या रंगीबेरंगी प्रकाशामध्ये न्हाऊन गेले होते.

एक एकांडा दमदार समुद्रपक्षी अगदी सुसाटपणे फरफरत चालला होता. सागरावर पसरलेल्या धुक्याच्या सावटाची तमा न बाळगता ! त्याच्या कर्णपटलावर दोनच आवाज येत होते. त्याच्याच पंखांची लयबद्ध फडफड आणि सागरतरंगांची खळखळ ! बाकी सागर आणि आकाश कसे शांत शांत होते !

तो समुद्रपक्षी स्वत:च्याच गतीच्या उन्मादामध्ये धुंद झाला होता. अचानक त्याला सागराच्या पृष्ठभागाखाली कसली तरी आगळीच हाल–चाल जाणवली. सागरतरंगांबरोबर लपंडाव खेळणाऱ्या दोन धावत्या

सावल्या त्याला दिसल्या. पाहता पाहता सागराचा पृष्ठभाग दुभंगला. त्या सावल्यांची जोडी वरती उसळली.

उगवत्या रवीचे पहिले वहिले किरण आता सागरावर झिरपू लागले होते. त्यांच्या प्रकाशामध्ये त्या सावल्यांचे रूपांतर दोन महाकाय आकृत्यांमध्ये झाले. त्या सळसळू लागल्या. रुपेरी मुलाम्याने झळझळू लागल्या.

त्या आकृत्या निसर्गाची एक विलक्षण किमया होती. सागराच्या हृदयामधून झेपावलेले ते दोन जलचर शिकारी देवमासे होते.

एकाचा आकार अगदी प्रचंड होता. आणि तो त्याच्या पाठीवरला सरळ ताठ मांसल फिन ! तोही तसाच प्रचंड ! त्याचे नाव होते हिंमत !

हिंमतची प्रियतमा मात्र त्याच्या मानाने बरीच लहान होती.

तिचे नाव होते जलनिशा !

सागराच्या पृष्ठभागावर येताच हिंमत आणि जलनिशा यांनी आपल्या फुप्फुसांमध्ये साठलेला कार्बन डायॉक्साईड वायू बाहेर फेकून दिला. त्यांच्या मस्तकांमधून पांढऱ्याशुभ्र पाण्याचे फवारे एकत्रितपणे उफाळले. त्यांच्या निनादाने सागरावर भटकणारे धुके थरारले. सागराच्या बाहुपाशामध्ये निश्चिंतपणे पहुडलेली स्तब्धता खडबडून जागी झाली.

हिंमत आणि जलनिशेच्या ऊबदार उच्छवासामधल्या वाफा सकाळच्या गारठ्यात गोठल्या. त्यांनी सागराच्या पृष्ठभागावर इंद्रधनूचे रंग उधळले. ते रंग क्षणभर तिथे तरंगले आणि मग हरवून गेले.

सागराने पुन्हा स्तब्धतेला आपल्या अथांग बाहुपाशात कवटाळले. तिला दिलासा दिला !

तो समुद्रपक्षी आता खूप दूर निघून गेला होता. सागराच्या घोर-गंभीर तरंगांच्या कुजबुजी शिवाय आकाशाच्या कानावर दुसरा कोणताच आवाज पडत नव्हता.

हिंमत आणि जलनिशा– शिकारी देवमाशांचे ते देखणे, राजबिंडे युगुल सागराच्या हृदयामधून जसे झर्रदिशी बाहेर झेपावले तसेच लुप्त झाले.

त्या नयनरम्य उष:काळी जलनिशेने संग्रामला जन्म दिला.

संग्रामने त्याच्या जन्मापूर्वीचे दहा महिने जलनिशेच्या पोटामधल्या ऊबदार घरट्यामध्ये घालवले होते. तिथे त्याने जलनिशेच्या शरीरामधल्या जीवनतरंगांचे गीत ऐकले होते– तिच्या पाव टन वजनाच्या हृदयाची धडधड आणि पाच सेंटीमीटर व्यासांच्या धमन्यामधून वाहणाऱ्या रक्ताची सळसळ !

आता संग्रामचे जग अचानक बदलले होते. !

अटलांटिक महासागराच्या थंडगार लाटांचे पहिले धक्के त्याला जाणवले. त्याचे नवजात शरीर थरथर कापू लागले. तो बावरून गेला. पहिल्यावहिल्या श्वासासाठी धडपडू लागला. जलनिशेने त्याला एक हळूवार धक्का दिला. त्याचे मस्तक सागराच्या पृष्ठभागावर आले.

संग्रामने डोळे उघडले. तो विस्मित झाला. त्याने भोवतालचे निसर्गचित्र आपल्या डोळ्यांत सामावून घेण्याचा प्रयत्न केला. प्रात:कालच्या सोनेरी किरणांनी नटलेला भव्य सागर ! प्रकाशाच्या झगमगत्या मुलाम्यात हरवलेले अफाट आकाश !

सागराच्या पृष्ठभागावर झुळझुळणाऱ्या शीतल जीवनगंधाने संग्रामला दिलासा दिला. त्याच्या मस्तकामधील भोकांमधून ओढून घेतलेल्या हवेची शिरशिरी त्याच्या शिथिल शरीरात पसरली. त्याच्या इवल्याशा हृदयाचे स्पंदन अल्पावकाशातच स्थिर आणि लयबद्ध झाले. त्याचे 'फ्ल्यूक' फडफडू लागले.

अटलांटिक महासागर आता पिसांचा पाळणा बनला. संग्राम त्या पाळण्यात लोळू लागला. मंदमंद झोके घेऊ लागला.

---

जलनिशेच्या ममतेने जाणले की संग्राम आता तान्हावला होता. ती लगेच आपल्या कुशीवर आडवी झाली. तिच्या ओटीपोटावर दोन मोठाल्या वळ्या होत्या. त्या वळ्या आता दूर झाल्या. त्यांच्यामधून दोन भली मोठी स्तनाग्रे बाहेर पडली. संग्रामच्या ओठांनी त्या स्तनाग्रांना स्पर्श केला.

जलनिशेने प्रेमळ स्वरात संग्रामला आर्जवले, गोंजारले. संग्रामने आपली जीभ एका स्तनाग्राभोवती गुंडाळली. त्याच्या जिभेचे एक नाळकेच बनले. ते नाळके लिटरच्या लिटर सकस दुधाने भरू लागले. संग्राम अधाशी-पणे तो जीवनरस घटघटा पिऊ लागला.

संग्राम जन्माला येईतोवर जलनिशेच्या शरीरावरील चरबी जवळ-जवळ वीस सेंटीमीटर जाड झाली होती. कारण त्यापूर्वीचे कित्येक महिने तिने हिंमतबरोबर आर्क्टिक महासागरात घालवले होते. तिथे भक्ष्याचा तुटवडा नव्हता. त्यामुळे तीन-चार महिने पुरेल इतके पोषक अन्न तिला आपल्या शरीरामध्ये साठवणे शक्य झाले होते.

तिचे दूध गाईच्या दुधाहून दसपट सकस होते. त्या दुधाच्या आहा-रावर संग्रामची वाढ भरभर होणार होती. दररोज चाळीस किलोग्रॅम अधिक वजन ! दर दहा दिवसांत अर्धा मीटर अधिक लांबी !

संग्रामने यथेच्छ दुग्धपान केले. मग तो जलनिशेच्या पाठीवर झोपी गेला. जलनिशेचाही डोळा लागला.

हिंमत अजूनही संग्रामला दिसला नव्हता. संग्रामने आपल्याला पाहून बिथरून जाऊ नये म्हणून तो थोडा लांबच राहिला होता. आता तो जल-निशा आणि संग्राम भोवती दक्षतेने घिरट्या घालू लागला. त्यांच्या संरक्षणासाठी हिंमतची गस्त आवश्यक होती.

संग्राम गाढ झोपेतून जागा झाला. जलनिशाही उठली.संग्राम आता ताजातवाना झाला होता. त्याने जलनिशेच्या कुशीत नाकाने गुदगुल्या केल्या. आपला हर्ष व्यक्त केला.

जलनिशेने वात्सल्यपूर्ण स्वरात त्याला गोंजारले. प्रेमाच्या आणि धीराच्या शब्दांनी ! तिने ताडले की आता संग्रामची त्याच्या पित्याशी ओळख करून देणे आवश्यक होते. तिने हिमतला उत्कट प्रेमभऱ्या आवाजात साद घातली.

हिंमतने आपल्या प्रियतमेची साद ऐकली. सागराच्या निळ्याशार पृष्ठभागाखाली चित्रविचित्र कवडसे नाचत होते.– सूर्यकिरणांचे ! त्यांच्या लकलकणाऱ्या प्रकाशामधून हिंमत आपल्या छोटेखानी कुटुंबाकडे सरसरला. अगदी मंद गतीने ! संग्रामने त्याला एकदम पाहताच बिचकू नये म्हणून !

संग्राम आकाराने तसा अगदीच लहान नव्हता. शिकारी देवमाशांच्या इतर अर्भकांप्रमाणे त्याची लांबी जवळजवळ अडीच मीटर होती. पण हिंमतच्या नऊ मीटर लांबीच्या अजस्र देहाच्या पहिल्यावहिल्या दर्शनाने त्याचे धावे दणाणले. तो जलनिशेला चिकटला. तिच्या कुशीमध्ये लपण्याचा प्रयत्न करू लागला.

हिंमत संग्रामजवळ आला. आपल्या नाकाने त्याला गुदगुल्या करून आर्जवू लागला, बोलावू लागला. जलनिशेने संग्रामला कुशीत घेतले. रसाळ प्रेमभऱ्या आवाजात त्याला दिलासा दिला. हळूहळू संग्रामची भीती मोडली. त्याने हिंमतला पाहताच घट्ट मिटून घेतलेले आपले डोळे किलकिले केले. त्या डोळयांमध्ये डोकावणारे भय कुठल्याकुठे पळून गेले. त्याची जागा आता मिश्किलपणाने घेतली.

हिंमत आकाराने संग्रामहून सहापट मोठा होता. त्याची पाठ काळसर होती, तर पोट पांढुरके. त्यामुळे तो सागराच्या पृष्ठभागावर तरंगणाऱ्या ढगांच्या सावली सारखा दिसायचा. त्याची चकाकणारी कातडी अगदी गुळगुळीत होती. त्याचे मस्तक रुंद होते. आणि खांदे अगदी भरदार. त्याचे शरीर शेपटीकडे निमुळते होत गेले होते.

हिंमतच्या डोक्यावर मोठाले कान नव्हते. होती फक्त दोन छोटीशी भोके. पण त्याची श्रवणशक्ती अतिशय तीक्ष्ण होती.

हिंमतचे डोळे त्याच्या शरीराच्या मानाने इवलेसे होते. अगदी द्राक्षाएवढे ! बाहेरच्या वातावरणात तो फार दूरवर बघू शकत नसे. त्याच्या डोळ्यांना दोनच रंग दिसायचे. काळा आणि पांढरा ! त्याला बुडणाऱ्या सूर्यबिंबाने केलेली रंगांची उधळण कधीच दिसायची नाही. दिसायच्या फक्त रुपेरी तेजाच्या बदलत्या छटा !

पाण्याखाली मात्र हिंमतला बरेच दिसायचे. पण खोलसर पाण्यात सूर्यप्रकाशही लुप्त होऊन जायचा. चारशे मीटर खोलीवर सगळीकडे गुडुप्प अंधार असायचा. तिथे हिंमत आपल्या मस्तकातून ध्वनितरंग सोडायचा. बाणाच्या टोकासारखे – ठराविक दिशेने ! मग त्यांचे प्रतिध्वनी परतायचे ते त्याला सांगायचे की पुढे काहीतरी आहे. ते किती मोठे आहे, कोणत्या दिशेने आणि गतीने पाण्यात हालचाल करते आहे; किती अंतरावर आहे, हे सगळे त्याला समजायचे.

निसर्गाने श्वापदाचे स्थान निश्चित करणारी ती अद्भुत शरीरयोजना शिकारी देवमाशांना बहाल केली आहे.

हिंमतने उच्छ्वास टाकला की त्याच्या मस्तकातून सहा मीटर लांबीचा पाण्याचा फवारा बाहेर पडायचा. त्याच्या डोक्यावर दोन मोठाली भोके होती. ती इतकी जवळजवळ होती की त्यांच्यामधून उधळले गेलेले पाणी एकत्रित व्हायचे. हिंमतने बाहेर फेकलेली हवा सागरावर वाहणाऱ्या शीतल वाऱ्यांहून ऊबदार असायची. त्यामुळे त्याच्या उच्छ्वासामधला ओलावा गोठायचा. त्याचा एक मोठाला ढग बनायचा !

लक्षावधी वर्षांपूर्वी. देवमासे जलचर नव्हते–भूचर होते. ! आणि आताही ते जलचर असले तरी मासे नाहीत– प्राणी आहेत ! ! सृष्टीमधले सर्वांत महाकाय प्राणी ! तेही सस्तन प्राणी ! ! सर्व माशांना पाण्यातूनच ऑक्सिजन घेता येतो. देवमाशांचे मात्र तसे नाही. त्याना ऑक्सिजनसाठी दिवसातून शंभरदा तरी सागराच्या पृष्ठभागावर येऊन वातावरणामध्ये श्वासोच्छ्वास करावा लागतो. त्यासाठीच हिंमतच्या मस्तकावर ती दोन मोठाली भोके होती.

पूर्ण वाढ झाल्यानंतर संग्राम हिंमतची हुबेहूब प्रतिकृती बनणार होता.

संग्रामच्या जन्मानंतरच्या दुसऱ्या सकाळचे किरण सागरावर पसरले.

संग्रामने आपले 'फ्ल्यूक' उचलले. डोके पाण्याबाहेर काढले. श्वास घेतला. शेपटी सरळ केली. फ्लिपरच्या मदतीने शरीर पाण्यामध्ये स्थिर ठेवले. मग आपल्या फ्ल्यूक, फ्लिपर आणि शेपटीच्या मदतीने तो थोडा पुढे सरकला.

त्याला त्या हालचालीमध्ये गंमत वाटू लागली. हिंमतने आणि जलनिशेने त्याला प्रोत्साहन दिले. बघता बघता तो मीटरच्या मीटर सरसरू लागला.

त्या संध्याकाळपर्यंत संग्राम जलनिशेच्या भोवती चकरा मारू लागला.

संग्रामच्या एका बाजूला सोबत होती हिंमतची आणि दुसऱ्या बाजूला जलनिशेची. त्याने सागराच्या अंतरंगामध्ये दडलेल्या अगणित रहस्यांचा थांग घ्यायला सुरवात केली.

संग्रामचा जीवनप्रवाह सुरू झाला.

जीवनप्रवाह कसला ? सागरसंग्रामच तो !



## ॥ दोन ॥

स्कॉटलंडच्या किनारपट्टीवर विखुरलेल्या बेटांच्या परिसरात त्या शिकारी देवमाशांच्या कुटुंबाने बरेच दिवस घालवले.

हिंमतला तो भाग खूप आवडायचा. कारण तिथे सागरतळ अगदी सपाट होता. कुठेही पाण्याखाली लपलेले कडे आणि दऱ्या नव्हत्या. हिंमत तिथे संग्रामला पाण्याखाली डुबक्या मारण्याचे धडे देऊ लागला.

हिंमतने एकामागून एक चार–पाच फवारे सोडून आपली फुप्फुसे मोकळी केली. मग अगदी सरळ रेषेत डोके खाली करून त्याने सागराच्या पृष्ठभागाखाली डुबकी मारली. त्याची शेपटी आणि फ्ल्यूक्स पाण्याखाली जाताच वर मोठाले बुडबुडे उफाळले.

संग्राम बावचळला. इकडे तिकडे चकरा मारत हिंमतला शोधू लागला. जलनिशा त्याची थट्टा करू लागली.

हिंमत बराच वेळ पाण्याखाली राहिला. त्याचे शरीर आता सागराच्या पृष्ठभागाला समांतर झाले होते. त्याने आपले डोके वर उचलले. तिरक्या दिशेने त्याने वरती सरसरायला सुरवात केली. संग्राम त्याला जिथे शोधत होता तिथून दूर तो पाण्यावर आला.

त्याने संग्रामला साद घातली. संग्राम जलनिशेबरोबर त्याच्याकडे सरसरला.

संग्रामने हिंमतची डुबकी मारण्याची बरीच प्रात्यक्षिके बघितली. एके दिवशी सकाळी त्याने हिंमतच्या आदेशानुसार मनाचा हिय्या केला. पाच-सहा फवारे एकामागोमाग सोडून त्याने आपली फुफ्फुसे मोकळी केली. हिंमतनेही फवारे सोडून त्याला साथ दिली.

संग्रामने हिंमतच्या पाठोपाठ पाण्याखाली डुबकी मारली.

हिंमतच्या आणि संग्रामच्या शरीरांमधे वीस मिनिटे पुरेल इतका ऑक्सिजन होता. त्यांच्या रक्तवाहिन्या आणि स्नायूंमधल्या तांबड्या रक्त-पेशी ऑक्सिजनने तुडुंब भरल्या होत्या. त्यामुळे त्यांना डुबकी मारण्यापूर्वी फुफ्फुसांमधे हवा ओढून घेण्याची गरज नव्हती. ते पाण्याखाली जाताच त्यांच्या शरीरातील रक्तप्रवाहामध्ये विशेष बदल घडू लागले. जवळ जवळ सर्वच रक्त त्यांच्या हृदयाकडे आणि मेंदूकडे जाऊ लागले. शरीराच्या इतर अवयवांची रक्ताची मागणी घटली. त्यांच्या तांबड्या रक्तपेशी मेंदूला हवा असलेला ऑक्सिजन पुरवू लागल्या.

हिंमतच्या प्रत्येक हालचालीचे अनुकरण करत संग्राम भरभर समुद्राच्या तळाकडे जाऊ लागला. त्याच्या चहूबाजूला पसरलेला धूसर प्रकाश हळू हळू कमी होऊ लागला. शेवटी अगदी गुडुप्प काळोख झाला.

हिंमत आणि संग्राम जसजसे खोल पाण्यात जाऊ लागले तसतशी त्यांची फुफ्फुसे आकुंचित होऊ लागली. दुमडली जाऊ लागली. पण ती मोकळी असल्यामुळे त्यांना कोणतीच इजा झाली नाही. इतर सस्तन प्राण्यांच्या बरगड्यांहून देवमाशाच्या बरगड्या वेगळ्या असतात. त्यांच्या दोनच बरगड्या छातीच्या हाडाला चिकटलेल्या असतात. इतर मोकळ्या-'तरंगत्या'! त्यामुळे खोल पाण्यामध्ये त्या आपोआपच दुमडतात. हिंमत आणि संग्रामच्या बरगड्याही दुमडू लागल्या.

हिंमत सागराच्या तळाकडे पाचशे मीटर इतके अंतर जाऊ शकत असे. तिथे त्याच्या शरीरावरच्या प्रत्येक चौरस सेंटीमीटरवर शंभर किलो-

ग्रॅम इतका पाण्याचा दबाव येई. सागराच्या पृष्ठभागाखाली मात्र तो दबाव एक किलोग्रॅम इतकाच असतो.

जवळ जवळ शंभर मीटर अंतर कापल्यावर हिंमत थांबला. त्याने संग्रामला एक आदेशात्मक धक्का दिला. त्याने आपले अनुकरण करावे म्हणून! मग हिंमतने आपले डोके वर उचलले. तो तिरक्या दिशेत पाण्याच्या पृष्ठभागाकडे पोहू लागला. संग्राम त्याच्या मागोमाग सरसरला.

ते दोघेही सागराच्या पृष्ठभागावर उसळले. जलनिशा अगदी झरझरत संग्रामजवळ आली. तिच्या डोळयांत कौतुक मावत नव्हते..

हिवाळा आला. सागराला त्याची चाहूल लागली.

उन्हाळयाच्या अखेरचे ऊबदार सूर्यकिरण आता थंडावू लागले. सागराच्या अंतरंगामध्ये उलटसुलट वाहणाऱ्या असंख्य प्रवाहांमध्ये हिवाळयाच्या गारठयाची जाणीव होऊ लागली. आकाशामध्ये स्थलांतर करणाऱ्या हजारो पक्ष्यांचे थवे दिसू लागले. सागराच्या पृष्ठभागावर त्यांची फडफडणारी, भरभरणारी प्रतिबिंबे नाचू लागली. ते सगळे पक्षी सागरामधे दूरवर विखुरलेल्या अगणित बेटांवर गेले होते. तिथे उन्हाळयात भरपूर खाद्य मिळते म्हणून ! पण आता हिवाळयाची कडाक्याची थंडी येणार म्हणून ते घाबरले होते आणि स्कॉटलंडच्या किनाऱ्यावरच्या खडकांमधल्या कडेकपारीतल्या ऊबदार घरटयांकडे परतू लागले होते.

संध्याछाया सागरावर पसरू लागल्या की हिंमत खोल सागर सोडून जलनिशेला आणि संग्रामला घेऊन किनाऱ्याजवळच्या उथळ पाण्यात येई. तिथे संग्राम अगदी मनसोक्त दुग्धपान करी. मग सागराच्या लाटा खडकांवर फुटल्यामुळे होणारे ध्वनि-प्रतिध्वनी तो डोळे मिटून आणि कान देऊन ऐकत राही. पण हिंमतला माहीत होते की, स्कॉटलंडचा तो आवडता किनारा आपणाला लवकरच सोडावा लागणार आहे.

थोडयाच दिवसांत जलनिशेच्या सकस दुधाने संग्रामच्या शक्तीत भर पडली. सागराच्या अवखळ सामर्थ्याशी टक्कर देण्याचा जोम त्याच्यामध्ये

येऊ लागला. आता हिंमतनेही आपल्या छोटयाशा कुटुंबाला घेऊन स्थलांतर करायचे ठरवले. त्याने अटलांटिक महासागराच्या आग्नेय कुशीमधे शिरण्याची तयारी केली. मार्ग अवघड होता. तुफान वेगाने उलटसुलट वाहणारे अनेक प्रवाह ओलांडावे लागणार होते.

हिंमत, जलनिशा आणि संग्राम यांचा जलप्रवाह सुरू झाला. ते नेहमी वेडयावाकडया आणि खडकाळ सागर किनाऱ्याला समांतर राहून पोहत. सागराच्या लहरी क्षणाक्षणाला बदलत– कधी शांत, धीरगंभीर, तर कधी अवखळ तुफानी ! लाखो समुद्रपक्षी सागर किनाऱ्यावर उडताना दिसत. सील, पॉर्‌पॉईज आणि देवमासे सागरात फिरताना आढळून येत.

सागर किनाऱ्याजवळ छोटया छोटया माशांचे अगणित कळप भटकत असत. समुद्रपक्षी आणि ते मोठाले जलचर त्या माशांच्या थव्यांवर हल्ले करून त्यांचा चट्टामट्टा करत. माशांचे ते थवे कुठेही असोत– वेगाने वाहणाऱ्या सागरप्रवाहामध्ये, खळबळत्या खोल पाण्यामध्ये, किनाऱ्यावरच्या शांत वाळूच्या गालिच्यावर किंवा काळयाशार खडकांच्या असंख्य कोनाडयामध्ये त्यांचे शिकारी कधीच फारसे दूर नसत.

हिंमत आणि जलनिशाही त्या ' अंगावर पिणाऱ्या ' संग्रामला बरोबर घेऊन त्या माशांच्या थव्यावर मेजवानी उडवत मार्गक्रमण करू लागले.

हिंमत आणि त्याच्या कुटुंबाने स्कॉटलंडच्या मुख्य भूमीचे ईशान्य टोक गाठले. तिथे ' केप रॉथला वळसा घातला. मग त्यांनी पूर्वेकडच्या ऑर्कनी बेटांच्या पुंजक्यांकडे जायला सुरवात केली. आता त्यांचा प्रवास सागर किनाऱ्यावरून पाचसहा किलोमीटर अंतरावर होऊ लागला. तिथे लाटा अगदी संथपणे डोलावत आणि मग तुफान वेगाने सागरकिनाऱ्यावरच्या खडकांवर फुटत. ते सागराच्या पृष्ठभागाखाली साधारणत: वीस ते पंचवीस मीटर खोलीवर पोहत. तिथून हिंमत सागराच्या गडद अंतरंगात शिकारीसाठी डुबकी मारी.

हिंमतने शिकारीसाठी डुबकी मारताच संग्रामचे तरुण तीक्ष्ण कान

सावध होत. तो सागराच्या खोल अंतरंगामधून येणाऱ्या चित्रविचित्र ध्वनींचे वेध घेऊ लागे.

हिंमत प्रथम अगदी शांतपणे, अजिबात आवाज न करता सागराच्या तळावर पोहत असे. मग त्याच्या मस्तकामधून ध्वनितरंग बाहेर पडत. तो त्या ध्वनितरंगांच्या प्रतिध्वनीचा मागोवा घेई. त्याच्या श्वापदाचे स्थान निश्चित करणाऱ्या अजब शरीरयंत्रणेचे लपलपणारे आवाज ऐकू येऊ लागत.

अधून मधून तो एखादी लांबलचक दमदार साद घाली. मग जलनिशेला समजे की हिंमत फार दूर गेलेला नाही. जवळपासच आहे !

अन् मग ऐकू येई– महाकाय हिंमतच्या विद्युत्‌वेगाने घातलेल्या झडपेमुळे निर्माण झालेली पाण्याखालची फरफर ! मृत्यूच्या अनपेक्षित दर्शनाने गलितगात्र झालेल्या श्वापदाचा अखेरचा आर्त आक्रोश ! हिंमतच्या शक्तिमान जबड्यातील धारदार सुळ्यांमधे चिरडल्या जाणाऱ्या हाडामांसाची कडकड ! आणि शेवटी भक्ष्य जबड्यात घेऊन उन्मादाने वर उफाळणाऱ्या हिंमतच्या शरीराची सरसर !

कॉड, काँगरईल, लिंग, पाऊटिंग आणि हॅडॉक– या सर्व सागरचरांना हिंमतने सोडलेले ध्वनितरंग ऐकू येत. क्षणभरातच त्यांच्या लक्षात येई की ते साक्षात मृत्यूच्या आगमनाचे संदेश आहेत. त्या ध्वनितरंगाचे प्रतिध्वनी हिंमतकडे परत पोहचत. दुसऱ्याच क्षणी हिंमत झडप घाली. त्या दुर्दैवी जीवांना प्रत्यक्ष मृत्यूचे दर्शन होई. निमिषार्धात हिंमत सागराच्या गहिऱ्या अंतरंगामधली त्यांची धडपड कायमची संपवून टाकी आणि मग तो सागराच्या पृष्ठभागावर उसळी मारी.

हिंमतची विशाल आकृती, रक्ताने माखलेला जबडा आणि त्यातून लोंबकळणारे भक्ष्याचे अवशेष पाहून संग्रामची थरथर उडे. पण जलनिशेच्या दिलाशाने तो परत शांत होई.

अधूनमधून जलनिशाही शिकारीसाठी हिंमत बरोबर डुबक्या मारी. संग्राम मात्र सागराच्या पृष्ठभागावरच रेंगाळणे पसंत करी. कारण त्याला

शिकारीची भीती वाटे. तो जलनिशेच्या दुधावरच आपली भूक भागवी.

एके दिवशी सूर्य अगदी माथ्यावर आला होता. सागराचा संथ पृष्ठ-भाग सूर्यप्रकाशामध्ये चमकत होता. हिंमत आणि जलनिशा संग्रामला वरच सोडून खोल पाण्यात शिकार करत होते.

संग्राम नेहमीच्या सवयीनुसार लाटांवर झोके घेत पहुडला होता. त्याला अचानक सागरामध्ये कांही अंतरावरून कसलेतरी वेगळेच आवाज ऐकू आले. बालिश कुतूहलाने तो आवाजाच्या दिशेने सरसरला. ते आवाज आता स्पष्टपणे ऐकू येऊ लागले. एक संथ आणि अखंड तर दुसरा 'लपक, लपक' असा आणि मोठ्याने, पण अधूनमधून येणारा. सागर शत्रूंनी रेलचेल आहे हे संग्रामला अजून ठाऊक नव्हते. तो कुतूहलाने त्या आवाजांच्या दिशेने पोहू लागला.

सहा मीटर लांबीचा एक भला मोठा शार्क मासा पाण्यात घिरट्या घालत होता. त्याची शेपटीच तीन मीटर लांबीची होती, अगदी त्याच्या शरीराएवढी ! तो अधून मधून पाण्यावर शेपटीने जोराने सपकारे मारत होता. त्या सपकाऱ्यांचे 'लपक लपक' असे आवाज आसमंतात घुमत होते.

तिथे एक मॅकरल माशांचा भला मोठा थवा होता. ते बिचारे छोटाले मासे त्या भयंकर शार्क माशाला पाहून गर्भगळित झाले होते. तो शार्क मासा थव्याच्या चारी बाजूला शेपटी आपटत फिरत होता. तो थवा एक-त्रित यावा म्हणून ! मग त्याला एकाच झडपेत सगळा थवाच्या थवा हडप करता येणार होता.

संग्रामच्या बालमनालाही आता त्या थव्याची कत्तल होणार हे सम-जले. तो मंत्रमुग्ध झाल्यासारखा त्या शार्क माशाची शिकार बघू लागला. आपल्याबरही तो शार्क मासा हल्ला करील हे त्याच्या लक्षातच आले नाही.

त्या अनुभवी शार्क माशाला संग्रामच्या वासाचा सुगावा लागला. आता आणखी एक चक्कर मारून तो त्या मॅकरल माशांच्या थव्यावर झडप घालणार होता. पण संग्रामला बघताच तो हरखला. त्याने त्या थव्याचा

नाद सोडून दिला. त्याची पाण्यावर आपटणारी शेपटी सरळ झाली. त्याचा अक्राळविक्राळ जबडा खदखदू लागला.

त्या संधीचा फायदा घेऊन निमिषार्धातच तो मॅकरल माशांचा थवा तिथून निसटला.

संग्रामच्या डोळ्यांतील कुतूहलाची जागा आता भीतीने घेतली. त्याने पोबारा करण्यासाठी शेपटी उचलली. डोके फिरवले.

अगदी त्याच क्षणी शार्क माशाने संग्रामवर झडप घातली.

संग्रामने एक आर्त किंकाळी मारली. त्या देवमाशाचे भयानक सुळे संग्रामच्या खांद्याला भिडले. त्याच्या कोवळ्या मासात घुसले आणि त्याने त्याचा एक मोठाला लचका तोडला.

संग्राम जीवाच्या आकांताने फडफडू लागला. सर्व शक्ती पणाला लावून हिंमत आणि जलनिशेच्या दिशेने पोहण्यासाठी धडपडू लागला. वेद-नांनी त्याला भोवळ आली. त्याचे सगळेच अवयव गळून गेले.

त्या शार्क माशाने सस्तन प्राण्याच्या कोवळ्या, चवदार मासाचा घास गिळला. तो रक्ताच्या वासाने बेभान झाला. त्याच्यापासून मीटरभर अंतरावर त्याला संग्रामची जखमी, चविष्ट बगल दिसली.

शार्क माशाने परत आपला जबडा उघडला तो झेपावला. त्याच्या नाकाने संग्रामच्या बगलेला स्पर्श केला. संग्रामला किंकाळीही मारता आली नाही. तो भीतीने अर्धमेला झाला.

त्याच क्षणी त्या शार्क माशाच्या शरीराचा जणू स्फोट झाला !

हिंमत आणि जलनिशा यांनी संग्रामची किंकाळी ऐकली होती. मग त्यांनी त्याच्या दिशेने सर्व शक्तीने फरफरायला सुरवात केली होती. हिंमतने क्षणभरातच जलनिशेला मागे टाकले होते. संग्रामजवळ येताच त्याच्या बगलेतली जखम आणि भळभळणारे रक्त हिंमतला दिसले होते. संग्रामच्या बगलेचा परत लचका तोडण्यासाठी येणारा तो शार्क मासा त्याने बघितला होता. त्याच्या मेंदूमध्ये संतापाचा डोंब उसळला होता.

हिंमतने सर्व शक्ती एकवटून शार्क माशाच्या बगलेत धडक मारली होती. आणि त्या धडकीबरोबरच त्या शार्क माशाचे प्राण आणि शरीर नष्ट झाले होते.

आता सागराच्या पाण्यावर लालसर सडा पडला होता. रक्त, हाडां-मासाचे तुकडे, अर्धवट पचलेले छोटे मासे सगळीकडे पसरले होते.

आता जलनिशाही तिथे पोहोचली होती. तिने पटदिशी संग्रामला कुशीत घेतले. संग्रामने परत डोळे उघडले. तो जलनिशेला बिलगला आक्रंदू लागला. ती त्याला गोंजारू लागली.

हिंमतने जलनिशेला किनाऱ्यावरच्या संथ पाण्याकडे चलण्याचा आदेश दिला.

सर्व जातीचे देवमासे संकटकाळी किनाऱ्याकडे वळतात, जमिनीकडे येतात. लाखो वर्षांपूर्वी जमीन हेच त्यांचे घर होते, म्हणून !

किनाऱ्यावरच्या उथळ पाण्यात जलनिशेने संग्रामला गोंजारले. त्याची जखम हळूवारपणे चाटली. त्याला आपले गरमगरम दूध पाजले.

तोवर संध्याकाळ झाली. किनाऱ्यावरचे समुद्रपक्षी अंगाई गीत गाऊ लागले. जलनिशेने आपला एक मोठाला बाजू पंख संग्रामच्या शरीराखाली घातला. संग्राम निद्राराणीच्या बाहुपाशात हरवून गेला.

जलनिशेनेही डोळे मिटून घेतले. पण तिच्या ममतेने तिला झोपू दिले नाही

हिंमत जलनिशा आणि संग्रामच्या चारी बाजूला गस्त घालू लागला.

वर आकाशात चंद्र उगवला. टिपूर चांदणे पडले. सगळा सागर चमचमू लागला.

हिंमत आणि त्याच्या कुटुंबाने त्यानंतरचे दोन आठवडे सागर किनाऱ्याजवळच घालवले. त्या काळात संग्रामची जखम भरून आली.

संग्रामने सागरसंग्रामाची 'श्री' काढली होती.

□

## ॥ तीन ॥

शिशिर ऋतूचे आगमन झाले.

धुक्याच्या गर्द सावटाने सागरावर पांघरूण घातले. माशांचे थवे दक्षिणेला जाऊ लागले. त्यांच्यावर मेजवानी करणारे समुद्रपक्षीही मागोमागच गेले. पण खोल पाण्यात अजूनही माशांचे बरेच थवे होते. शिवाय या काळातही सील समुद्राच्या खडकांमधून राहात. ते बरेचसे निष्काळजी असत. त्यामुळे शिकारी देवमाशांना खाद्य मिळतच होते

हिंमतने निर्णय घेतला. संग्राम अजून लहान होता. त्यामुळे तो हिवाळा सागराच्या त्या परिचित भागामधे घालवणे आवश्यक होते. हिवाळ्याच्या अखेरीस तिथे खाद्याची थोडी कमतरता जाणवली असती. पण थोड्या प्रयत्नाने हिंमत आपल्या कुटुंबाचे पोषण करू शकला असता.

आणि वसंत ऋतूच्या आगमनाबरोबरच जीवन परत रसभरे होणार होते.

एक हिवाळी संध्याकाळ आली. काळ्याशार ढगांच्या झुंबडी सागरावर गर्दी करू लागल्या. वारा घोंघावू लागला. त्याने वातावरण झोडपून काढायला सुरवात केली. आकाशात विजा कडकडू लागल्या. त्यांचे वळ चोहीकडे चमचमू लागले. अटलांटिक महासागर हिंसक उलथापालथीच्या

तयारीने उफाळू लागला. सागरावर फिरणारे समुद्रपक्षी भयभीत झाले. वादळ सुरू होण्यापूर्वीच त्यांनी किनाऱ्यावरील खडकांच्या आसऱ्याकडे पलायन केले.

सागरकिनाऱ्यापासून दूरवर पांढऱ्याशुभ्र लाटा खळबळत होत्या. हिंमत, जलनिशा आणि संग्राम त्या लाटांच्या बिछान्यावर लोळत होते. वादळाची चिन्हे दिसताच हिंमतने त्यांना आपल्या मागोमाग येण्याचा आदेश दिला.

वादळाने सागरावर थैमान घालायला सुरवात केली. आता संग्रामची तारांबळ उडाली. सागराचे अंतरंग हेलावू लागले. संग्रामला पोहणे अतिशय अवघड झाले. त्याची शक्ती भरभर संपू लागली. त्याची दमछाक झाली. त्याला श्वास घेण्यासाठी परत परत सागराच्या पृष्ठभागावर यावे लागू लागले.

हिंमत संग्रामच्या एका बाजूला आला. आणि जलनिशा दुसऱ्या बाजूला. त्या दोघांनी संग्रामला धीर द्यायला सुरवात केली. कित्येक टन वजनाच्या लाटा हिंमतच्या बलाढ्य पाठीवर आदळू लागल्या, फुटू लागल्या. त्या लाटांचे पाणी संग्रामच्या शरीरावर कोसळू लागले. संग्राम श्वासोच्छ्वासासाठी केविलवाणी धडपड करू लागला. त्याचे शरीर जीवाच्या आकांताने फडफडू लागले. तो मागे पडू लागला. बावरलेल्या जलनिशेने त्याला साद घातली. ती त्याला आर्जवू लागली. विनवण्या करू लागली. पण वादळाच्या तुफानी खळबळीने आता जोर धरला होता. जलनिशेच्या सादी त्या आवाजात हरवून गेल्या.

वादळाच्या मार्गावरच कित्येक किलोमीटर अंतरावर सागरामध्ये एक बेटांचा पुंजका आहे. ऑर्कनी नावाचा! ऑर्कनी बेटांच्या मध्यावर टेकड्यांची झुंबड आहे. आणि त्यांच्या मधोमध एक प्रचंड संथ जलाशय आहे. त्याचे नाव स्कॅपा फ्लो ! अटलांटीक महासागरामधून या जलाशयाकडे

जाण्याचे अनेक मार्ग आहेत. चिचोळे, ऑर्कनी बेटांची उभी आडवी चिरफाड करणारे !

पहिल्या महायुद्धामध्ये जर्मनीचा पराभव झाला. व्हर्सायच्या अपमानकारक तहानुसार जर्मन नाविक दलाची सर्व जहाजे दोस्त राष्ट्रांना देण्याचे ठरवले. पण शत्रूराष्ट्रांना आपली जहाजे देण्याची नामुष्की जर्मन नाविक दलाने झुगारून लावली. जर्मनीने आपले आरमार एका जलाशयात बुडवून टाकले. तोच हा स्कॅपा फ्लो !

अनादि काळापासून वादळात सापडलेल्या सागरप्रवाशांना आसरा देणारा तो सागरस्वर्ग ! आज तिथे चोहीकडून मानव आणि सागरचर येत होते-सील, पॉरपॉईज, डॉल्फिन आणि देवमासे ! मच्छीमाऱ्यांच्या नावा आणि नाटो राष्ट्रांची अटलांटीक महासागरावर टेहेळणी करणारी शस्त्रसुसज्ज जहाजे !

वादळाच्या शक्तीबरोबर झगडत हिंमतही आपल्या कुटुंबाला घेऊन स्कॅपा फ्लोच्या दिशेने वाटचाल करू लागला.

रात्र वाढत गेली. आणि तिच्या बरोबर वादळाचा जोरही !

संग्राम आता पूर्णतः थकून गेला होता. त्याची वाटचाल आता हिंमतच्या आणि जलनिशेच्या आधाराने चालली होती. हळूहळू जलनिशाही थकू लागली. अवखळ सागर प्रवाह तिला खेचू लागले. संग्रामपासून दूर नेऊ लागले. क्षण-दोनक्षण ती पाण्यांच्या लाटांमध्ये हरवून जाऊ लागली मग जीवाच्या आकांताने संग्रामला शोधू लागली. त्या काळ्या रात्री ते कित्येकदा घडले. पण जलनिशेच्या ममतेने सागराच्या शक्तीवरही मात केली. ती प्रत्येक वेळी परत संग्रामच्या जवळ आली.

हिंमतने आणि जलनिशेने त्या रात्रभर वादळाशी झुंज दिली. संग्रामचे रक्षण केले.

पहाटेचा अंधुक प्रकाश सागरावर पसरू लागला. हिंमतने आणि जलनिशेने संग्रामला अखेर स्कॅपा फ्लो च्या सुरक्षिततेमध्ये ढकलले.

संग्रामच्या मरगळलेल्या मनाला हळूहळू भवतीभवतीची जाणीव होऊ लागली. तो जणू काही दीर्घ झोपेतून जागा झाला होता. त्याच्या लक्षात आले की आपण वादळाच्या कचाट्यातून निसटलो आहोत.

सकाळ झाली. सूर्याची कोवळी किरणे सागरावर नाचू लागली. त्यांच्या ऊबदार प्रकाशामध्ये संग्रामने मनसोक्त दुग्धपान केले. त्या गरम जीवनरसाने त्याचे बालमन शांत झाले. त्याच्या मन:पटलावर उमटलेली वादळाची भयानक प्रतिबिंबे तात्पुरती का होईना पुसून गेली.

संग्रामने सागरसंग्रामाचे दुसरे अक्षर गिरवले होते.

त्या हिवाळ्यात संग्रामने हिंमत आणि जलनिशा यांच्या शिकारीचे बारकाईने निरीक्षण केले. त्याने त्यांना सील आणि पॉर्पॉइज माशांची शिकारकरताना बघितले.

संग्राम त्यांच्याबरोबर सागराच्या तळाशी डुबक्या मारू लागला. तिथे त्याने त्यांना खडकांमधे वावरणाऱ्या कॉड, स्क्वीड आणि कॉंगरईलची शिकार करताना पाहिले.

कधीकधी त्याने त्यांना तांबड्या लॉबस्टरवर भूक भागवताना पाहिले.

कॉड मासे आता दक्षिणेची वाटचाल करू लागले होते. हिंमतच्या प्रतिध्वनींचा वेध घेणाऱ्या शरीरयंत्रणेला त्यांचा सुगावा लागे. मग सागराच्या पृष्ठभागाखाली फक्त पन्नास मीटरवर शिकारी डुबकी मारत. तिथला अंधुक प्रकाश संपून गहिऱ्या अंधकाराला सुरवात होई. उन्हाळ्यामधे भरपूर खाद्य मिळून पुष्ट झालेल्या कॉड माशांचे थवे तिथे असत. त्यांच्या रांगाच्या रांगा शिकाऱ्यांच्या भक्ष्यस्थानी पडत.

कधीकधी शिकारी कॉंगर ईलना समुद्रतळावरील आपल्या खडकाळ घरट्यांमधे पकडत. मग एकाच हिसक्यानिशी त्यांना बाहेर खेचून त्यांचा चट्टामट्टा करत.

बरेच दिवस त्यांना शिकार मिळत नसे. मग त्यांना दिसे एखादा भोळसर समुद्रपक्षी, शिकाऱ्यांची चाहूल न लागलेला ! सागराच्या पृष्ठ–

भागावर निष्काळजीपणे झोपी गेलेला ! शिकारी पटकन् त्याचा खातमा करत.

अधूनमधून वादळाने वाहून आणलेले सील आणि समुद्रपक्षी त्यांना दिसत ! मग त्या मृतदेहाच्या तुटपुंज्या आहारावरच शिकाऱ्यांना समाधान मानावे लागे.

संग्राम अजूनही बच्चाच होता. त्यामुळे तो प्रत्यक्ष शिकारीमध्ये मात्र भाग घेत नसे. त्याला जलनिशेच्या दुधावरच खूष रहावे लागे.

हिवाळ्याचा जोर जास्तच वाढू लागला. हिंमत आणि जलनिशा यांचे जीवन फारच खडतर झाले.

संग्रामची शारीरिक वाढ आता झपाट्याने होऊ लागली. तो शक्तिमान होऊ लागला. खवळलेल्या सागरच्या थैमानाला तो आता तोंड देऊ लागला. सागराच्या अंतरंगामधे वावरणाऱ्या चित्रविचित्र प्राण्यांविषयींचे त्याचे ज्ञान वाढू लागले. कधी अवचितपणे, तर कधी त्याच्या मातापित्यांचे भक्ष्य म्हणून ते जलचर त्याच्या सामोरे येऊ लागले.

हिवाळा संपत जाऊन वसंत ऋतू जवळ येऊ लागला. संग्रामला आता माणसाची आणि त्याने निर्मिलेल्या यंत्राचीही माहिती होऊ लागली. त्याने मच्छीमारी नावावर बसविलेल्या इंजिनांचा घरघराट ऐकला. मच्छीमारांचे ओरडणे त्याला समजू लागले. त्याची तीक्ष्ण श्रवणेंद्रिये जाळ्यांना पाण्यात पडताना होणारा वैशिष्ट्यपूर्ण आवाज ओळखू लागली. मोठाल्या जहाजांवरच्या पंख्याच्या थरथरीशीही त्याची ओळख झाली.

मोठ्या जहाजांचे आवाज ऐकताच हिंमत व जलनिशा संग्रामला घेऊन वेगाने सागरकिनाऱ्याकडे जात. संग्रामला मात्र त्याचे कारण समजत नसे. तो अजूनही अननुभवी होता. त्याला सागराची ओळख झाली होती. पण त्याला माहीत नव्हते की देवमाशांचा सर्वांत मोठा शत्रू जमिनीवर राहतो. त्या मोठाल्या जहाजांमधून तो प्राणी देवमाशांची सागरावर शिकार करतो.

त्या प्राण्याचे नाव आहे माणूस !

---

पण हिंमतला मात्र तो आवाज चांगला माहीत होता. त्या आवाजा-मागची भयानकता त्याने अनुभवली होती.

तो प्रसंग कित्येक वर्षांपूर्वी घडला होता.

हिंमत त्यावेळी बच्चाच होता. स्कॉटलंडच्या किनाऱ्यावरच त्याचा कळप वावरत होता त्या कळपाचा म्होरक्या हिंमतचा पिता होता.

त्याचे नाव होते जलेंद्र !

त्या दुर्दैवी सकाळी एक प्रचंड जहाज त्या किनाऱ्याजवळ आले. जहा-जाच्या पुढच्या टोकावर एक फिरती बंदूक होती. त्या बंदुकीने एक मोठाली बरची उडवता येत असे त्या बरचीच्या मागोमाग तिला बांधलेला नाय-लॉनचा दोर जाई. बरचीच्या तोंडावर एक स्फोटक टोक होते. ती बरची देवमाशांच्या शिकारीसाठी होती.

बरची वेगाने देवमाशाच्या शरीरात खोलवर घुसे आणि मग तिच्या टोकाचा स्फोट होई. बरचीमधून चार लांबलचक काटेरी तारा बाहेर पडत. त्या देवमाशाच्या शरीरामधल्या अवयवात घुसत, त्याची चिरफाड करत. त्या देवमाशाने दूर जाण्यासाठी धडपड केली, तर त्याची जास्तच चिरफाड होई.

बरची देवमाशाच्या छातीत घुसली तर त्याचा अंत लवकर होई. त्या काटेरी तारा त्याचे हृदय फाडत. त्याच्या फुप्फुसांचा चेंदामेंदा करत. एक शेवटचा लालभडक रक्ताचा फवारा त्याच्या मस्तकामधून उफाळे.

पण जलेंद्राच्या नशिबात मात्र ते नव्हते.

जलेंद्र अनुभवी होता. त्याने ओळखले की त्याच्या कळपाची कोंडी झाली होती. कळपाला त्या शिकारी जहाजाच्या तडाख्यातून निसटून जायचे असेल तर कोणालातरी त्या जहाजाला सामोरे जावे लागणार होते. किनाऱ्यावरचे पाणी खोल होते. त्यामुळे तिथे त्याच्या कळपाला आसरा मिळणे शक्य नव्हते.

त्या बिचाऱ्याला माहीत नव्हते की त्या दिवशी किनाऱ्याजवळ दहा-बारा शिकारी जहाजे आली होती. त्यांनी पसरलेल्या सापळ्यातून त्याचा कळप बाहेर पडणे शक्य नव्हते.

मनाचा हिय्या करून जलेंद्र सरळ त्या जहाजाला सामोरा गेला. जहाजावरचे खलाशीही अनुभवी होते. ते बहुधा कळपाच्या म्होरक्याची शिकार सर्वात शेवटी करत. कारण त्याची शिकार अगोदर केली, तर सगळा कळप निसटून जाण्याची शक्यता असते. जोपर्यंत कळप धोक्यात असे तोपर्यंत म्होरक्या कुठंही जात नसे. त्याची शिकार सोपी असे.

पण आता ती समस्या नव्हती. कळपाची शिकार करण्यासाठी इतर जहाजेही जवळपास होती.

जहाजाच्या अवतीभवती मुसंड्या मारणाऱ्या जलेंद्रचे धूड बंदुकी-मागच्या खलाशाने निरखून पाहिले. मग त्याने जलेंद्रच्या छातीवर नेम धरला. बंदुकीचा चाप ओढला. त्याच क्षणी जलेंद्रने आपली गती वाढवली. बरची त्याच्या छातीमध्ये घुसण्या ऐवजी शेपटीच्या भागात घुसली.

जलेंद्र किंचाळला. त्याचा कळप भीतीने सैरावैरा धावू लागला. पांगून गेला.

हिंमत मात्र पळाला नाही. तो दूरवरून आपल्या पित्याकडे पहातच राहिला.

जलेंद्रच्या शेपटीमध्ये वेदनांचा दाह उसळला. एकाच हिसक्यानिशी त्याच्या ऐंशी टन वजनाच्या शरीराने सर्व शक्ती एकवटून, जहाजाच्या विरुद्ध दिशेने पोहायला सुरवात केली. पाचशे टन वजनाचे ते शिकारी जहाज ओढले जाऊ लागले. जहाजावरच्या खलाशांच्या लक्षात आले की त्या बलाढ्य शिकारी देवमाशाबरोबरची जहाजाची ती झुंज रंगणार होती. त्या झुंजीचा शेवट मात्र एकच होणार होता. मग झुंज बघण्यासाठी सगळे खलाशी जहाजाच्या डेकवर आले.

जहाजाच्या इंजिनाची शक्ती वाढली. जलेंद्रच्या शरीरातल्या बरची-मागे बांधलेल्या दोरावरचा तणावही वाढला. जहाजावरची यंत्रे त्या दोराने जलेंद्रला जहाजाकडे ओढण्यासाठी मोठ्याने घरघरू लागली. पण जलेंद्र कांही कच्चा नव्हता. त्याने वेदनेची पर्वा करण्याचे सोडून दिले. तो उसळत भिरभिरत मुसंड्या मारू लागला. सागराचे पाणी त्याच्या रक्ताने लाल-भडक झाले.

विस्फारलेल्या डोळयांनी भीतीने थरथर कापणारा इवलासा हिंमत त्याच्या पित्याची अखेरची झुंज पहात होता.

जवळजवळ चार तास त्या जहाजावरची यंत्रे जलेंद्रच्या शक्तीवर मात करण्यासाठी उच्च स्वरात घरघरत होती. हळू हळू जलेंद्रची अफाट शक्ती कमी कमी होऊ लागली. त्याच्या मस्तकामधल्या संतापाची जागा आता केविलवाणेपणाने घेतली. त्याच्या शेपटीतल्या वेदनांचे लोळ त्याच्या शरीरामध्ये पसरू लागले.

सूर्य जसा डोक्यावर आला, तशी जलेंद्रची झुंज संपुष्टात आली. जहाजावरच्या शक्तिमान इंजिनांनी त्याला जहाजाकडे ओढायला सुरवात केली. तो फडफडू लागला.

जलेंद्रचे शरीर आता पुन्हा जहाजावरील बंदुकीच्या माराच्या टप्प्यात आले. बंदुकीमध्ये दुसरी बरची तयार होती. बंदुकीच्या मागे उभ्या असलेल्या खलाश्याने दुसऱ्यांदा चाप ओढला.

यावेळी बरचीचा नेम चुकला नाही. ती जलेंद्रच्या रूंद पाठीतून त्याच्या हृदयात घुसली. त्याच्या मस्तका मधून लालभडक फवारा उफाळला. जलेंद्र थोडा फडफडला. त्याच्या भोवतालचे पाणी अधिक लाल झाले. मग जलेंद्रची फडफड संपली. तो उपडा झाला. त्याचे प्रचंड पांढुरके पोट पाण्यावर आले.

एका खडकाच्या आडोशाने हे सगळे गलितगात्र हिंमतने पाहिले. त्याच्या पित्याच्या रक्ताचा सागरावर पसरलेला वास त्याला जाणवला. त्याच्या कळपातल्या इतर शिकाऱ्यांचीही आसपासच्या पाण्यात कत्तल झाली होती. तो सगळा सागरकिनाराच तांबडालाल झाला होता. सगळीकडे रक्ताचा दर्प पसरला होता.

त्या किळसवाण्या वासाने हिंमत भडाभडा ओकू लागला.

त्या शिकारी जहाजाने जलेंद्रचा निचेष्ट देह आता अगदी जवळ ओढून घेतला. एक मोठाली अणकुचीदार टोक बसविलेली नळी जहाज-

वरच्या यंत्राने त्याच्या पोटात घुसवली. त्या नळीने त्याच्या शरीरात हवा भरायला सुरवात केली. त्याचा देह फूगू लागला. आता तो पाण्याखाली बुडणार नव्हता. त्याच्या पोटामध्ये एक झेंडा खुपसण्यात आला.

त्याच वेळी जहाजावर टेहळणी करणाऱ्या खलाशाला दूरवर कळपामधली निसटून गेलेली एक शिकारी मादी दिसली. गडबडीने जहाज त्या मादीकडे वळले. तिचा पाठलाग करू लागले.

हिंमतच्या छोटाल्या शरीरात परत प्राण आले. मृत्यूच्या सान्निध्यापासून दूर जाण्याच्या नैसर्गिक शक्तीने त्याच्या मेंदूची पकड घेतली. तो सागरकिनाऱ्यापासून, त्या शिकारी जहाजापासून दूर खोल खोल सागराकडे वेडावल्यासारखा, सैरावैरा पोहू लागला.

जलेंद्रचे कलेवर सागराच्या पाण्यावर तरंगत राहिले. थोड्याच वेळात एक दुसरे जहाज तिथे आले. त्या जहाजाने ते ओढून न्यायला सुरवात केली.

दूर सागरकिनाऱ्यावर एक अतिप्रचंड, पोलादाच्या पेटीप्रमाणे दिसणारे जहाज उभे होते. त्या जहाजाभोवती मृत शिकारी देवमाशांचे देह विखुरले होते. जलेंद्रचा देहही त्याला ओढून आणणाऱ्या जहाजाने तिथे सोडला.

त्या पोलादाच्या पेटीप्रमाणे दिसणाऱ्या जहाजावर शेकडो खलाशी काम करत होते. त्या जहाजावरच्या यंत्राच्या कानठळ्या बसवणाऱ्या घरघरीने आसमंत दुमदुमून गेले होते. त्या जहाजावरच्या एका प्रचंड पोलादी पंजांनी जलेंद्रच्या शेपटीची पकड घेतली. आणि मग ती शेपटी जहाजावर ओढली गेली—आणि मागोमाग बाकीचे शरीर !

प्रचंड करवतींच्या फाळयांनी जहाजावर पडलेल्या त्या मृत शिकाऱ्याची चमडी आणि चरबी कापली. मग मोठाल्या हूकनी तिचे तुकडे टरटरा फाडले. यांत्रिक कुऱ्हाडींनी डोके धडावेगळे केले. मणक्यांचे आणि शरीराचे तुकडे केले. ते सगळे तुकडे मोठाल्या हौदांमध्ये भरले गेले. अर्ध्या तासात सगळे काम आटोपले.

सहा तासांपूर्वी सागरावर उन्मादाने आरूढ होणाऱ्या बलाढ्य जलेंद्रचा असा भयानक शेवट झाला. त्याच्या सागरसंग्रामाची अखेर झाली.

---

त्या रात्री हिमतला खोल सागरामध्ये जलनिशा भेटली. जलेंद्रच्या कळपातले ते दोघेच वाचले होते. बाकी सगळा कळप मानवाच्या राक्षसी लालसेला बळी पडला होता.

ती भयानक कत्तल हिमत आणि जलनिशा यांच्या सागरसंग्रामाचा पहिला धडा होता.

त्या दोघांनाही माहीत होते की मानव त्यांचा सर्वात क्रूर शत्रू होता. त्या जहाजांच्या इंजिनाची घरघर मृत्यूचा संदेश होता. आणि म्हणूनच तो ऐकताच ते दोघे संग्रामला घेऊन तिथून दूर जात होते.

पण संग्रामला अजून बरेच शिकायचे होते. त्याचा सागर संग्राम नुकताच सुरू झाला होता ना !



## ॥ चार ॥

□

वसंत ऋतू आला. त्याने हिंवाळ्याच्या थंडगार बोचऱ्या वाऱ्यांना पळवून लावायला सुरवात केली.

आता शिकार करणेही सोपे जाऊ लागले. प्रथम मॅकरल माशांचे थवे उत्तरेकडे परतू लागले. लांबलचक आणि खादाड टोप मासेही त्यांच्या बरोबरच आले. मागोमाग आले मोठाले, निळे शार्क मासे आणि कठु, उग्र चेहऱ्याचे पोर्ट ईगल मासे ! हे सगळे जलचर सागराच्या अंधाऱ्या अंतरंगातून अगदी वेगाने झरझरत सागराच्या पृष्ठभागाकडे येत. मग हिंमत आणि जलनिशेच्या अजस्र धुडाच्या दर्शनाने घाबरुन तितक्याच वेगाने लुप्त होत

सागरावर पसरलेले धूसर आकाश आता परत निळेशार झाले. विविध पक्ष्यांच्या किलबिलीने गजबजून गेले. ते सगळे पक्षी दूरवरच्या सहारा वाळवंटावरून आले होते. तिथल्या भयानक उष्म्यापेक्षा अटलांटिक महासागरावरचा मस्त उन्हाळाच त्यांना अधिक पसंत होता.

संग्राम शेपटीवर उभा राहू लागला. तो आपले तोंड पाण्याबाहेर काढू लागला. त्याने त्या सर्वांना येताना किलकिल्या डोळ्यांनी न्याहाळले.

एका संध्याकाळी हिंमतने खोल पाण्यामध्ये शिकारीसाठी डुबकी मारली. एक प्रचंड, तरणाबांड नर शिकारी देवमासा आसपासच हिंडत

होता. तो संधी साधून जलनिशेशी लगट करू लागला. तिला आपल्याबरोबर चलण्यासाठी विनवू लागला. संग्रामला त्या नरशिकाऱ्यावर चालून जायचे धाडस झाले नाही.

जलनिशेने हिमतला साद घातली. तिच्या सादीने सावध झालेला हिमत विद्युतवेगाने सागराच्या पृष्टभागाकडे सरसरला. संग्रामच्या विस्मित डोळ्यांसमोर सागराची स्तब्धता एका भयानक खळबळीने संपवून टाकली. संतापलेल्या हिमतने त्या प्रेमवीरावर हल्ला केला. आपले प्रचंड सुळे त्याने त्याच्या कुशीमध्ये खुपसले. गचागच हिसके द्यायला सुरवात केली. आश्चर्यचकित झालेल्या त्या आगंतुकाने स्वतःला हिमतच्या जबडयातून कसेबसे सोडवून घेतले.

त्या नरशिकाऱ्याच्या जखमेमधून वाहणारा रक्ताचा लोट सागरावर पसरू लागला. तो तरुण होता. त्याने खवळून हिमतवर हल्ला केला. हिमतने त्याला सहजगत्या हुलकावणी दिली आणि परत त्याचा मोठाला चावा घेतला.

जलनिशा कौतुकाने हिमतचे पवित्रे बघत होती. संग्राम तिच्या कुशीला चिकटला होता.

त्या नरशिकाऱ्याने तिसऱ्यांदा हिमतवर हल्ला केला. हिमतने परत त्याचा हल्ला चुकवला. त्याच्या खांद्यात भली मोठी जखम केली.

आता हिमतही खूपच संतापला. त्याने बचाव करण्या ऐवजी त्या नरशिकाऱ्यावर हल्ला चढविला.

अखेर त्या आगंतुकाला शहाणपणा सुचला. त्याने स्वतःला कसेबसे सोडवून घेतले आणि शेपूट फिरवून पोबारा केला. त्याच्या मागोमाग रक्ताचे लोंढे पाण्यात दिसू लागले.

हिमत जलनिशेजवळ आला. त्याने आपल्या ओठांनी तिला गुदगुल्या करून धीर दिला. जलनिशा आणि संग्रामने अगदी अभिमानाने बलदंड हिमतकडे बघितले.

एका दुपारी काही शार्क मासे हिमतच्या कुटुंबाच्या जवळ येण्याची

मस्ती दाखवू लागले. संग्रामने एकामागून एक हल्ले चढवून त्यांचा खातमा केला. कांही शार्क मासे अगोदरच पळून गेले. संग्रामने ते सर्व बघितले. त्याच्या स्मरणशक्तीने हिंमतचा प्रत्येक पवित्रा टिपला.

त्या उन्हाळयात संग्रामने जलनिशेचे दूध सोडले. तो आता मोठा झाला होता. त्याने शिकार करायला सुरवात केली.

संग्राम सागराच्या पृष्ठभागाखाली गिरक्या मारणाऱ्या निळया, हिरव्या मॅकरल माशांच्या अवखळ थव्यावर हल्ले करू लागला. त्यांचा पाठलाग करत तो खोल पाण्यामध्ये डुबक्या मारू लागला. या सुरवातीच्या प्रयत्नात त्याचे श्वापद नेहमीच त्याच्या जबडयातून निसटून जाई. त्यामुळे तो रंजिस होई. पण उन्हाळयाच्या जोराबरोबरच संग्रामचे शिकारीमधले कौशल्यही वाढू लागले.

हळू हळू दोन मीटर लांबीच्या सॅलमन माशांचे थवेही स्कॉटलंडच्या किनाऱ्याकडे परतू लागले. त्यांच्या तांबूस, पिवळसर पाठी किनाऱ्यावरच्या केंदाळामध्ये गर्दी करू लागल्या. किनाऱ्यावरच्या टेकडयांवर लवकरच पावसाच्या सरी कोसळणार होत्या. नद्यांना पूर येणार होते. त्यांच्या पाण्याची पातळी खूप वाढणार होती मग ते थवे नद्यांच्या मुखामध्ये घुसणार होते. तिथेच त्यांचा जन्म झाला होता आणि तिथेच ते नव्या पिढयांना जन्म देणार होते.

हिंमतला सॅलमन माशांचे थवे सागरामध्ये दूरवर असतानाच त्यांचा सुगावा लागे. तो जलनिशा आणि संग्राम यांना घेऊन पहाटेच्या अंधुक प्रकाशात किनाऱ्याकडे जाई. तिथे ते शेपटयावर उभे राहून आपली तोंडे सागराच्या पृष्ठभागावर काढत. त्यांचे डोळे सागराच्या पृष्ठभागावर लहरणाऱ्या लाटांना निरखत. मग नद्यांच्या मुखाकडे धावणाऱ्या सॅलमन माशांच्या थव्यांची सळसळ त्यांना ऐकू येई

हिंमत, जलनिशा आणि संग्राम एकाच रेषेत खांद्याला खांदे भिडवून सागराच्या तळावरच्या वाळूवर सरसरत जात.

वर सागराच्या पृष्ठभागाखाली सॅलमनचे थवेच्या थवे दिसत. कोठे कोठे सागराचा पृष्ठभागच त्यांच्या छताआड लपून जाई आणि मग

शिकाऱ्यांच्या मेजवानीला आरंभ होई. हिंमतच्या आदेशानुसार ते सॅलमन माशांच्या फिकट, पांढरट पोटांकडे उफाळत. त्यांच्या धडकीने सॅलमन मांशाची शरीरे सागराच्या पृष्ठभागावरील हवेत उधळली जात. त्यांची रुपेरी शरीरे सकाळच्या गुलाबी उन्हाच्या झळीत चमचमत. सागराच्या संथ पाण्यावर ती ज्वालासारखी थयथय नाचत. त्यांच्या मागोमाग शिकाऱ्यांची प्रचंड शरीरे पाण्यावर उफाळत. त्यांची काळी-पांढरी शरीरे, सळसळती गुलाबी पोटे क्षणभर त्या ज्वालावर आरूढ होत.

सॅलमन माशांचे थवे परत सागराच्या पृष्ठभागावर कोसळत. त्यांच्याबरोबर शिकारीही आपले शेपूटपंख आणि बाजूपंख यांनी सपकारे मारत थव्यांमध्ये आदळत. त्यांचे प्रचंड जबडे अतिवेगाने उघडत, मिटत. सॅलमन माशांची अगणित थरथरणारी शरीरे ते बकाबक गिळून टाकत.

उन्हाळा संपुष्टात आला. हिवाळ्याचे पहिले वहिले बोचरे वारे सागरावर वाहू लागले. सॅलमन आणि मॅकरल मासे नाहीसे होऊ लागले. शिकाऱ्यांनी जाणले की उन्हाळ्याची मजा आता लवकरच संपणार होती.

संग्राम आता वर्षभराचा झाला होता. त्याची लांबी साडे तीन मीटरहूनही जास्त झाली होती. त्याचे शरीर उफाळणाऱ्या लाटांमधून अगदी सहजपणे सरसरत जाऊ लागले होते.

हिंमतने जाणले की संग्रामला घेऊन दूर पल्ल्याचा सागरप्रवास करणे आता शक्य होते. त्याने आपल्या कुटुंबाला घेऊन दक्षिणेकडच्या सागरातील एका बेटाकडे जाण्याचे ठरवले. तिथे त्यांना हिवाळ्याचा खडतरपणा जाणवला नसता. भरपूर खाद्य मिळाले असते.

त्या जागेचे नाव होते सील बेट !

हिंमत, जलनिशा आणि संग्राम यांचा जलप्रवास सुरू झाला.

दुसऱ्या दिवशी दुपारी त्यांना दूरवर हंपबॅक जातीच्या देवमाशांचा एक कळप दिसला. त्याच्यामधला एक देवमासा अगदी मुक्तकंठाने गात होता.

कधी उच्च स्वरात, तर कधी अगदी संथ स्वरात. त्याचे गाणे ऐकून संग्राम विस्मित झाला त्याला ते नवीन होते.

पण हिंमत त्या कळपाच्या फार जवळ गेला नाही. संग्रामने ओळखले की त्या कळपात बरेच देवमासे होते. आकाराने हिंमतहून थोडे मोठेच ! त्यामुळे त्यांच्या फार जवळ जाणे धोक्याचे होते.

मग एके दिवशी त्यांना सत्तर-ऐंशी डॉलफिनचा एक कळप आढळला. अडीच मीटर लांबीचे डॉलफिन खऱ्या अर्थाने मासे नसतात. तेही देवमाशां-प्रमाणे सस्तन प्राणी आहेत. त्यांचा मेन्दू अत्यंत चाणाक्ष असतो.

डॉलफिननीही शिकाऱ्यांचे अस्तित्व जाणले. देवमाशांमधे ते फक्त शिकाऱ्यांनाच घाबरत. त्यांचे पाण्याच्या लाटांबरोबर आणि एकमेकाबरोबर खेळणे एकदम बंद झाले. त्यांनी पाठ फिरवून पोबारा केला.

पण हिंमत तुफान वेगाने त्यांचा पाठलाग करू लागला. शेवटी मागे राहिलेल्या एका डॉलफिनला जबड्यात घेऊन तो माघारी आला.

जलनिशेची आणि संग्रामची चंगळ झाली.

सील बेट आता जवळ येऊ लागले.

त्या बेटावरल्या उत्तरेकडच्या सपाट भागात एक शेतकरी रहात होता. बायको आणि दोन मुले एवढेच छोटेसे कुटुंब होते त्याचे. एक दुभती गाय, काही शेळ्यामेंढ्या आणि थोडीशी शेती ही त्याच्या उपजीविकेची साधने होती. अधूनमधून आपली नाव घेऊन तो मच्छीमारीसाठीही जाई.

तो शिकारी कित्येकदा सागराच्या किनाऱ्यावरील खडकावर येऊन बसे. आपल्या फिकट, निळ्या डोळ्यांनी तो सागराचा क्षितिजापर्यंन्त वेध घेई. त्या भागात वावरणारे सील त्याला दिसत.

काळ्या पांढऱ्या रंगाच्या, तीन मीटर लांबीच्या त्या सीलना कान नव्हते. त्यांची कातडी केसाळ होती. ते दक्षिणेकडचे सील होते. सील मासे नसतात. तेही सस्तन प्राणी आहेत. त्यांचे पायही देवमाशांच्या पायांप्रमाणे आखूड झाले आहेत. आता त्यांचा उपयोग शेपूटपंख म्हणून पोहण्यासाठी होतो.

तो शिकारी त्या सीलना बघत राही. कधी लाटांवर खेळताना तर कधी किनाऱ्यावरील खडकांमध्ये शिकार करताना. तो स्वत:शीच विचार करी– किती साम्य आहे माझ्या आणि या सीलच्या जीवनात ! दोघांचीही धडपड चालली आहे–जगण्यासाठी !

त्या छोटयाशा बेटाभोवतालचा परिसर म्हणजे सीलचे भूतलावरील नंदनवन होते. शिशिर ऋतूबरोबरच सील तिथे प्रजोत्पादनासाठी येत. त्या बेटाचा किनारा त्यांच्या किलबिलीने जिवंत होई. सीलच्या माद्या फेसाळल्या लाटांवर खेळत किनाऱ्यावरच्या खडकामधल्या खोबण्या हेरून ठेवत. किनाऱ्यावरच्या वाळूमधे उबदार खड्डे खणत. तिथे त्यांच्या नवजात अर्भकांना आसरा मिळे. एकदोन महिन्यांत पुळणीवर सीलची हजारो पिवळट–पांढरी पिल्ले दिसत. त्यांच्या दंग्याने वातावरण गजबजून जाई.

आता हिंमत जलनिशा आणि संग्राम यांना घेऊन त्या बेटाच्या परिसरात आला होता. सर्वांची एकच धडपड चालली होती-- जगण्याची! एकमेकांना खाऊनही ! निसर्गाचा नियमच आहे तो !

एके दिवशी सकाळी नेहमीच्या सवयीनुसार शेतकरी सागराची टेहळणी करत होता. अचानक त्याच्या नजरेने फेसाळत्या लाटांवर लोळणारी एक काळसर–तपकिरी आकृती टिपली. प्रत्येक वर्षी बेटाच्या किनाऱ्यावर हजारो सीलच्या माद्या बछड्यांना जन्म देत. त्यातही कित्येक बछडी निसर्गाच्या कोपाला बळी पडत. त्यांची मृत शरीरे बेटाभोवतीच्या सागरावर विखुरलेली दिसत. ते सर्व शेतकऱ्याने अनुभवले होते.

पण त्या आकृतीला पाहून शेतकरी चरकला. ती आकृती एका थोराड नरसीलची होती. पण त्या सीलला डोकेच नव्हते. त्याच्या पोटावरचा मासाचा एक लांबलचक तुकडाही ओरबडून काढण्यात आला होता. तिथे एक किळसवाणी जखम दिसत होती.

शिकारी विचारमग्न होऊन घरी परतला.

दुसऱ्या दिवशी सकाळी शेतकरी परत किनाऱ्यावर आला. सागराची टेहळणी करू लागला.

थोड्याच वेळात त्याला एक घायाळ नरसील कसाबसा पाण्यातून किनाऱ्याकडे येताना दिसला. तो सील शेपूटपंख ओढत एकदाचा पुळणीवर आला. धपापल्यासारखा श्वासोच्छ्वास करू लागला. त्याच्या मागे वाळूवर रक्ताची धार स्पष्टपणे दिसत होती. त्याचा एक शेपूटपंख अगदी नीटपणे कापला गेला होता.

सील अगदी घाई घाईने किनाऱ्याकडे आला होता. जणू काही त्याचा पाठलाग होत होता. शेतकऱ्याला तीच शंका आली. त्याने सागराकडे नजर फेकली. हिंमत त्याच्या दृष्टीस पडला.

हिंमतचे प्रचंड शरीर वेगाने किनाऱ्याकडे फरफरत होते. त्याच्या समोरच्या पाण्यात एक मोठाली धनुष्याकृती लाट निर्माण झाली होती. त्याच्या पाठीवरचा मोठाला पंख त्या लाटेचा मागोवा घेत सरसरत होता. पाणी कापत होता. हिंमतच्या मस्तकातून पाण्याचा फवारा उफाळला. हिंमत किनाऱ्याच्या अगदी जवळ पोहोचला. शेतकऱ्याला वाटले की त्याचे पोट किनाऱ्यावरच्या खडकांवर घासत असणार.

अखेर हिंमत परत फिरला. सागराच्या दिशेने सरसरू लागला. थोड्याच अंतरावर दोन काळसर सावल्यांनी हिंमतबरोबर पोहायला सुरवात केली.

शेतकऱ्याने विस्मित नजरेने ते दृश्य बघितले.

त्या रात्री शेतकरी विचारमग्न होऊन शेकोटीजवळ बसला. त्याला समजून चुकले की ती प्रचंड धुडे शिकारी देवमाशांची होती. त्याला हेही आकळले की ते सीलची शिकार करण्यासाठी बेटाच्या परिसरात आले होते. तसे पाहिले तर सीलच्या कत्तलीविषयी शेतकऱ्याला वाईट वाटण्याजोगे कांहीच नव्हते. कारण सील मच्छीमारांची जाळी कुरतडत. बेटाजवळच्या पाण्यामधल्या माशाचा फज्जा उडवून खूप नुकसान करत.

पण शिकाऱ्याने शिकारी देवमाशांविषयी इतरही बऱ्याच गोष्टी ऐकल्या होत्या. शिकारी देवमासे जवळपास असताना त्याला मासेमारीसाठी आपली नाव घेऊन सागरावर जाणे शक्य नव्हते. त्या राक्षसांनी त्याच्या

नावेवरही हल्ला केला असता. त्याचाही खातमा केला असता. आणि हिवाळ्यात मासेमारीसाठी जाणे तर आवश्यक होते.

त्या रात्री झोपी जाताना शेतकऱ्याच्या मनामध्ये एकच विचार होता— ते शिकारी देवमासे परत बेटाजवळ फिरकू नयेत !

रात्रीबरोबर वाऱ्याची झमझमही वाढली. पावसाच्या आणि गारांच्या झपाट्याने बेटावर थैमान घातले. सीलची बछडी निसर्गाच्या त्या भडिमारांमुळे किंचाळू लागली. माद्यांनी बछड्यांना कसाबसा आसरा देण्याचा प्रयत्न केला.

त्या पहाटे शेतकरी लवकर उठला. सागरकिनाऱ्यावरील खडकांवरून त्याने किनाऱ्याकडे पाहिले. धूसर प्रकाशातून सीलच्या बछड्यांचे पांढुरके मृतदेह त्याला वाळूत पहुडलेले दिसले.

शेतकरी धावतच पुळणीवर गेला. त्याला सागरावर दूर त्या तीन भयावह आकृत्या दिसल्या. वाळूवर धाव घेणाऱ्या लाटा अधून मधून रक्ताळल्या दिसल्या. किनाऱ्यावरचे सील भयभीत नजरांनी सागराकडे पहात होते. मोठमोठ्याने चीत्कारत होते.

हिंमत, जलनिशा आणि संग्राम प्रचंड लाटांच्या उचबंळणाऱ्या टेकड्यांना सहजपणे पार करत होते. त्या विशालकाय जलचरांना पाहून शेतकरी दिङ्मूढ झाला. त्याला कळून चुकले की त्याला जगायचे असेल, तर एकच मार्ग होता. त्या शिकारी देवमाशांना बेटाच्या परिसरातून पळवून लावावे लागणार होते.— किंवा मारून टाकावे लागणार होते.

पण कसे ? शेतकऱ्याने मनात निश्चय केला !

पुढच्या सकाळी शेतकरी अगदी लवकर उठला. तो किनाऱ्यावरच्या एका ऊंच खडकावर जाऊन बसला.

त्याने किनाऱ्यावर नजर भिरकावली. जवळजवळ पन्नाससाठ सील वाळूवर झोपी गेले होते. अगदी शांतपणे. मुळीच हालचाल न करता !

त्यांची शरीरे रात्री लाटांनी किनाऱ्यावर फेकलेल्या वाळूच्या पोत्यासारखी दिसत होती

सकाळच्या सूर्याचे किरण सागरावर पसरू लागले. त्यांच्या ऊबदार स्पर्शाने झोपलेले सील हळूहळू जागे झाले. बछड्यांनी दुग्धपानासाठी माद्यांच्या कुशीत शिरायला सुरवात केली.

शेतकऱ्याची नजर किनाऱ्यापासून कांही अंतरावर खिळली. तिथे एक मोठाला नरसील माशांची शिकार करत होता. अधून मधून तो किनाऱ्या-वरच्या आपल्या माद्यांकडेही पहात होता. कोणी दुसरा नरसील एखाद्या मादीला पळवून नेईल म्हणून !

हिंमतने पूर्वेच्या दिशेने हल्ला केला. त्यामुळे त्याची झडप झगमगत्या सूर्यप्रकाशात लपून गेली. त्याने शेवटचे चारशे मीटर अंतर अत्यंत वेगाने कापले. सीलला त्याची चाहूलच लागली नाही. अगदी शेवटच्या क्षणी हिंमतचे चमचमणारे शरीर त्याला दिसले.

पण तोपर्यंत फार उशीर झाला होता.

हिंमतच्या सागराच्या पृष्ठभागावर उंचावलेल्या ताठ बाजू पंखाने धडक मारली. तो सील गर्रकन् फिरला. त्याच्या चेंदामेंदा झालेल्या फुप्फुसातली सगळी हवा निघून गेली. मग हिंमतच्या बलाढ्य पंखाने त्याला पाण्यातून उच-लून हवेत भिरकावले. परत लाटांच्या कुशीत आदळण्यापूर्वीच सील गतप्राण झाला हिंमतने डोळ्याचे पाते लवते न लवते एवढ्यात एकाच घासात त्याला मटकावले.

शेतकरी ते दृश्य बघून थक्क झाला.

किनाऱ्यावर सीलनी आक्रोश करायला सुरवात केली. आकाशामध्ये उडणारे समुद्रपक्षी गलबलू लागले.

पण हिंमतला त्या आवाजाची पर्वा होतीच कुठे ? तो आपल्या हल्ल्यामुळे निर्माण झालेला कलकलाट शांत होताच परत शिकारीला सुर-वात करणार होता.

शेतकऱ्याने अगदी धीमेपणे आपली बंदूक उचलली आणि नेम

घेतला. हिंमत लाटांच्या टेकड्यावर पोहत होता. त्याचा प्रचंड बाजूपंख सागराच्या पृष्ठभागावर सरसरत होता. त्याचे अजस्र, काळसर धूड अगदी सहजपणे सागराचे पाणी कापत होते.

शेतकऱ्याला उचंबळणाऱ्या पाण्यामध्ये हिंमत अगदी स्पष्टपणे दिसला. तो प्रचंड सरळताठ पंख, त्याचे अवाढव्य शरीर, मोठाले शेपूट—त्याच्या डोक्यामागचा पांढरा शुभ्र पट्टा !

शेतकऱ्याने बंदुकीचा चाप ओढला.

बंदुकीच्या आवाजाने किनाऱ्यावरचे सील आणि आकाशातले समुद्र-पक्षी एकदम चिडीचिप झाले.

गोळीने हिंमतच्या गर्दनीचा वेध घेतला ती त्याच्या डोक्यातून वेगाने भिरभिरत गेली जणू तिच्या मार्गात चरबी, मास आणि हाडे नव्हतीच. हिंमतच्या एका मणक्याच्या चिंधड्या उडाल्या. त्यांच्या हाडांचे तुकडे फुप्फुसात घुसले. हिंमतचा अजस्र, बलाढ्य देह झटकू लागला, फडफडू लागला. त्याच्या शेपटीवरच्या पंखांनी पाण्यावर सपकारे मारले. त्याने फुप्फुसामधली हवा एका आर्त किंकाळीबरोबर बाहेर फेकून दिली. त्या आवाजाने सागरावरची हवा थरथरत राहिली.

सील आणि समुद्रपक्षी आणखीनच गप्प झाले.

हिंमतच्या मस्तकातून हवा, पाणी आणि रक्ताचे लोट उफाळले. त्याच्या आसपासचे पाणी किळसवाणे हाडामांसांचे तुकडे आणि रक्त यांनी लालभडक झाले. त्याने किनाऱ्याकडे पाठ फिरवली. अगदी अशक्तपणे तो खोल सागराकडे जाऊ लागला. त्याच्या मागोमाग पाण्यात काळसर दाट रक्ताचा लोट उठला.

जलनिशा आणि संग्राम यांनी हिंमतची जीवघेणी किंकाळी ऐकली. त्यावेळी ते सागरामध्ये किनाऱ्यापासून अवघ्या आठशे मीटर अंतरावर होते. त्या दोघांनीही एकदम मुसंडी मारली. ते विद्युतवेगाने हिंमतच्या दिशेने पोहू लागले. तिथे एखादा धोका असेल याची त्यांना पर्वा नव्हती.

ते हिंमतजवळ पोहोचले. हिंमत सागराच्या तळावर होता. तिथे धादळत, आपटत, झुकांड्या खात दिशाहीन होऊन चालला होता. त्याच्या अवतीभवतीचे पाणी तांबडे लाल झाले होते. त्या दोघांनी मिळून हिंमतला सागराच्या पृष्ठभागावर आणले. त्याची पाठ पाण्यावर काढली.

हिंमतचा भव्य पंख एखाद्या दारुड्यासारखा पाण्यावर झुकांड्या खाऊ लागला. जलनिशा आणि संग्राम यांनी त्याला हळूवारपणे खोल सागराकडे न्यायला सुरवात केली. किनाऱ्यावर धोका आहे हे त्यांनी जाणले. हिंमतचा पंख सरळ होऊन पाणी कापू लागला. त्याच्यापुढे धाव-णाऱ्या लाटेमध्ये लालभडक पाण्याचे शिपकारे उडू लागले.

शेतकरी आश्चर्यचकित झाला. त्याने हरणांना आणि सशांना जखमी सोबत्याला सोडून धूम ठोकताना पाहिले होते. पण अत्यंत क्रूरतेने सागर-चरांचा संहार करणाऱ्या त्या जलराक्षसांची वागणूक त्याला विचित्र वाटली. त्या दोन छोट्या आकृत्या आपले प्राण वाचवण्यासाठी पळून का गेल्या नाहीत हे त्याला समजले नाही.

त्याच्या हातातली बंदूक गळून खालच्या खडकांमध्ये पडली. अगदी आंधळ्यासारखा अडखळतच तो आपल्या घरी पोहोचला.

त्या रात्री सागराला भरती आली. शेतकऱ्याची खडकामध्ये पडलेली बंदूक लाटांच्या तडाख्यांत कुठल्याकुठे वाहून गेली होती !

तो दिवस जलनिशा आणि संग्राम यांना अतिशय भयानक गेला. हिंमत अर्धवट शुद्धीत होता. पण त्याला वेदनांची जाणीव मात्र होत होती. जलनिशा आणि संग्राम यांनी त्याला कसेबसे सागराच्या पृष्ठभागावर ठेवले.

एकदोनदा त्याला आधार देण्यासाठी जलनिशेने थोडा जोराने धक्का दिला. मग तो किंचाळला जलनिशेचे हृदय भडभडून आले. ती त्याला प्रेमळ स्वरात साद घालू लागली.

पश्चिमेला सूर्यबिंब क्षितिजामागे जाऊ लागले. सागराचे पाणी तांबूस-सोनेरी दिसू लागले.

सूर्यास्ताबरोबरच हिंमतचा सागरसंग्रामही संपून गेला. त्याने एक शेवटचा, निरोपाचा चीत्कार मारला. तो पाण्यात उपडा झाला. त्याचे पांढुरके पोट क्षण, दोन क्षण संध्याकाळच्या धूसर प्रकाशात चमकले. मग त्याचा शेवटचा सागरप्रवास सुरू झाला.

सागराच्या तळाकडे !

पश्चिमेला सूर्यबिंब पूर्णत: क्षितिजाआड लपले. उरल्या सुरल्या किरणांनीही सागराचा निरोप घेतला.

जलनिशा आणि संग्राम यांनी वाढत्या अंधारामध्ये खिन्नपणे पोहायला सुरवात केली.

हिंमतच्या मृत्युमुळे त्यांचे जीवनही अंधारमय झाले होते.



## ॥ पाच ॥

हिमतच्या अकाली मृत्यूमुळे जलनिशेच्या मनामध्ये एक भयानक पोकळी निर्माण झाली. असह्य.

हिमतने कित्येक वर्षे तिला साथ दिली होती. तिने त्या शक्तिमान नरशिकाऱ्यावर पूर्णत: विसंबून तो काळ घालवला होता. त्याने तिला मार्गदर्शन केले होते. तिचे पोषण केले होते. सागराच्या कोनाकोपऱ्यांमधून लपलेल्या अनेक शत्रूंपासून तिचे रक्षण केले होते. प्रसंगी तिच्या भवतीभवती घुटमळणाऱ्या आगंतुक नरशिकाऱ्यांना पळवून लावले होते. हिमत जलनिशेचा जीवनसखा होता.

आता संग्राम मोठा झाला होता. त्याने हळूहळू जलनिशेच्या मनातली पोकळी भरून काढायला सुरवात केली. हिमतला सोडल्यानंतर एक मौनाचा बुरखा निर्माण झाला होता. तो संग्रामने फाडून टाकला.

संग्राम आता शिकारी बनला. तो श्वापद शोधण्यासाठी ध्वनितरंग सोडू लागला.

त्याने प्रथम हळूवार, लांबलचक तरंग सोडायला सुरवात केली. मग तो प्रतिध्वनीचा मागोवा घेऊ लागला. त्याने सोडलेले ध्वनितरंग सागराच्या अंतरंगात दूरवर पोहोचू लागले. कित्येकदा ते खोल सागराच्या तळावर आदळत. तिथून परतत. ते प्रतिध्वनींनी संग्रामला सांगत की खालच्या थंडगार

अंधःकाराला कुठे तरी अंत आहे, सीमा आहे.

सागराच्या सर्व दिशांकडून त्याच्या ध्वनितरंगांचे प्रतिध्वनी त्याच्याकडे परत येत. ते त्याला चित्रविचित्र सूचना देत. कधी त्याला वाटे ते माशाच्या थव्याचे आहेत, कधी बेटाच्या खडकाळ किनाऱ्याचे, तर कधी पाण्याच्या एखाद्या वेगळ्या तपमानाच्या पट्ट्याचे. सगळेच कसे अपरिचित आभासात्मक होते!

आणि त्याची नजरही त्याला कधी फारशी मदत करत नसे. त्याला दिसत ते फक्त स्वच्छ पाण्यातले बुडबुडे! सागराच्या धूसर अंतरंगात विरून जाणारे!

पण आता हिंमतची विलक्षण आकलनशक्ती संग्रामच्या मदतीला नव्हती. त्यामुळे त्याची स्वतःची इंद्रिये तीक्ष्ण होऊ लागली.

तो आता डॉल्फिनना त्याचा सुगावा लागण्याआधी ऐकू लागला. सागराच्या तळावर पोहण्याची कला त्याने आत्मसात केली. तो सागराच्या पृष्ठभागावर लाटांच्या माथ्यावरून तरंगत जाऊ लागला. त्यामुळे त्याला श्वापदाजवळ चाहूल न लागता जाणे आणि झडप घालणे शक्य होऊ लागले.

आता त्याची लांबी जलनिशे इतकी झाली. सहा मीटर! त्याचे सामर्थ्य वाढले. आता तो न थकता जलनिशेबरोबर पोहू लागला. लांब पल्ल्याचा प्रवास करू लागला. पण हिंमतच्या विलक्षण गतिवृद्धीची युक्ती मात्र त्याला अजूनही गवसली नव्हती.

लवकरच तारुण्याच्या आगमनाची जाणीव त्याला होऊ लागली. त्याच्या पाठीवरचा पंख वाकडा होता. तो आता सरळ होऊ लागला. त्याचे रूपांतर नरशिकाऱ्याच्या ताठ, बलाढ्य अस्त्रात होणार होते.

शक्तिमान, वेगवान संग्राम आता खरोखरीचा नरशिकारी बनला. हिंमतबरोबर असताना पाण्यातून ऐकू येणाऱ्या वेगवेगळ्या आवाजांचे अर्थ आता त्याला समजू लागले.

पण संग्रामही एकाकी होता. जलनिशेसारखाच!

रात्रीच्या मुलायम अंधारात ते दोघेही सागराची कुजबूज ऐकत. त्यांना हिंमतच्या सोबतीत घालवलेल्या दिवसांची अनावर आठवण येई.

ऑक्टोबरचे बोचरे वारे सागरावर वाहू लागले. संग्राम आणि जल-निशा यांनी फेरोजच्या दिशेने वाटचाल सुरू केली.

सागराच्या त्या अनोख्या निसर्गचित्रावर हिवाळचाचा पडदा पडला. संग्राम आणि जलनिशा शेटलँड आणि आइसलँड यांच्या दरम्यानच्या साग-राच्या पट्ट्यात पोहोचले. त्यांना अचानक देवमाशांचे परिचित आवाज ऐकू येऊ लागले.

ते आवाज प्रथम अगदी हळूवारपणे आले. सागराच्या तळावर पसरलेल्या लाटांवर वाहणाऱ्या प्रवाहाच्या आवाजासारखे ! पण त्यांनी संग्रामला खडबडून जागे केले. त्याचा तल्लख मेंदू सावध झाला. तो साग-रात खोलवर जाऊ लागला कान देऊन एकाग्र चित्ताने ऐकू लागला. जल-निशाही त्याच्याबरोबरच होती. मग ते आवाज मोठे होऊ लागले. ते शिकारी देवमाशांचेच आवाज होते.

संग्राम आणि जलनिशा यांच्या मनामध्ये आशेचे, आनंदाचे अंकुर फुटले.

०

सकाळच्या किरणांच्या सागरामधल्या कवडशांत एकदम खळबळ उडाली. त्या दोघांना अनेक काळी-पांढरी शरीरे चोहीकडे थयथय नाचतांना दिसली. त्या सर्वांचे लक्ष संग्राम आणि जलनिशा यांच्याकडे वेधले होते. शिकारी देवमाशांच्या माद्या, तरूण नरशिकारी आणि बछडे त्यांच्याकडे कुतूहलाने पाहात होते. बडबडत होते. गात होते.

आणि मग एकदम देवमाशांचे ते नृत्य संथ झाले. पूर्णतः थांबले. सगळीकडे शांतता पसरली.

संग्रामची नजर त्या शिकारी देवमाशांच्या कळपाबाहेर गेली. तिथे कळपाच्या चारी बाजूला कोणीतरी पोहत होते. भुतासारखी दिसणारी, स्तब्ध, अजस्त्र करडी आकृती !

शिकारी देवमाशांच्या कळपाने बाजूला सरकून त्या आकृतीला वाट दिली. ती प्रचंड आकृती संथपणे संग्राम आणि जलनिशा यांच्याकडे

सरसरू लागली. तिचा रंग गर्द होऊ लागला. आकार वाढू लागला. ती जवळजवळ येऊ लागली.

तो एक नरशिकारी होता. त्याच्या अजस्र शरीरावर जखमांचे अनेक व्रण होते. त्याच्या पाठीवरचा बलाढय पंख बरचीने मधोमध फाटला होता. तो नरशिकारी त्या भल्या मोठ्या कळपाचा म्होरक्या होता.

त्याचे नाव होते विशाल !

विशाल जवळ येताच संग्राम पुढे सरकला. स्वाभाविक धाडसाने ! जलनिशेच्या संरक्षणासाठी ! पण त्याची गरजच नव्हती. संग्राम अजूनही बच्चाच होता. विशालच्या अफाट सामर्थ्यापुढे त्याचा क्षणभरही टिकाव लागला नसता.

विशालने आपल्या कुरूप, करड्या डोक्यामध्ये निर्णय घेतला. त्याने संग्रामला आणि जलनिशेला आपल्या कळपात सामील करून घेतले.

संग्राम आणि जलनिशा आता एकाकी नव्हते.

विशालने आपल्या उमद्या, दमदार आवाजात अगदी हळूवारपणे आदेश दिला. कळपातले सगळे देवमासे दक्षिणेकडे वळले, पोहू लागले.

सागराच्या पाण्यावर एकामागून एक जाणाऱ्या देवमाशांच्या पाठीवरल्या पंखांची रांग लागली. सर्वात पुढे चालला होता. एक उन्मत्त, मांसल, मधून फाटलेला पंख !

संग्रामचा जलप्रवास परत सुरू झाला.

विशाल मूळचा उत्तर आर्क्टिक महासागरातला ! उत्तर ध्रुवाच्या परिसरामधल्या बर्फाच्या कड्याखाली त्याचा जन्म झाला होता. त्याचे बालपण त्या ओक्याबोक्या बर्फाळ प्रदेशात जगण्याच्या धडपडीत गेले होते. त्याने मातेचे दूध सोडल्यानंतर कांही दिवसांतच त्याला निसर्ग कोपाचा पहिला तडाखा मिळाला होता. एक हिमकडा कोसळल्यामुळे त्याचे संपूर्ण कुटुंब चिरडून मृत्युमुखी पडले होते.

एकटा विशालच त्या अपघातातून वाचला होता. त्याचा आता

स्वभावही आता हिमकड्यासारखा झाला होता. बर्फाळ, थंडगार, गूढ !

त्या अपघातानंतर लवकरच विशालचे रूपांतर एका प्रचंड, शक्तिमान नरशिकाऱ्यामध्ये झाले होते. मग त्याने त्या बर्फाळ प्रदेशाचा निरोप घेतला होता. तो नॉर्वेच्या उत्तरेला आला होता. तिथे तळपत्या उन्हाळी सूर्याखाली त्याने आपला पहिला कळप एकत्र केला होता. त्यानंतर कित्येक वर्षे त्याने नॉर्वे आणि आइसलँडच्या दरम्यान सागरभ्रमण केले होते. सागराचा तो भाग खाद्याने भरला होता. त्यामुळे त्याच्या कळपातल्या देवमाशांची संख्या वाढली होती.

आणि मग विशालवर दुसरा आघात झाला होता. निसर्गकोपाचा नव्हे ! माणसाच्या लालची वृत्तीचा !

एका भयानक दिवशी देवमाशाची शिकार करणाऱ्या एका जहाजाने त्याच्या कळपाचा पाठलाग केला होता. नॉर्वेच्या किनाऱ्यावरच्या एका चिंचोळ्या खाडीत त्याच्या कळपाची कोंडी झाली होती. त्याचा संपूर्ण कळप त्या शिकारी जहाजावरच्या बरच्यांना बळी पडला होता.

विशाल एकटाच त्या संकटातून वाचला होता. एका बरचीने त्याची बगल फाडून काढली होती. दुसऱ्या बरचीने त्याच्या पाठीवरच्या कल्ल्याचा चेंदामेंदा केला होता.

आयुष्यात दुसऱ्यांदा विशाल एकाकी झाला होता. त्याने नॉर्वेचा किनारा सोडला होता, तिथले बर्फाळ कडे आणि चिंचोळ्या खाड्यांचा निरोप घेतला होता. अनुभवाची अमूल्य शिदोरी पाठीशी घेऊन !

आणि आता तो त्या शिकारी देवमाशांच्या प्रचंड कळपाचा म्होरक्या बनला होता !

कळपातल्या अननुभवी देवमाशांना कित्येकदा विशालचे आदेश समजत नसत. पण त्या आदेशाचे उल्लंघन करण्याची हिंमत मात्र कोणालाही नव्हती. नॉर्वेच्या किनाऱ्यावरच्या त्या भयानक अनुभवानंतर विशालला जमिनीच्या सान्निध्यात असुरक्षितता भासे. जहाजाच्या इंजिनाची घरघर ऐकू येताच तो आपल्या कळपाला घेऊन खोल सागराकडे वळे.

विशालचा अनुभव त्याला उपयोगी पडला होता. आतापर्यन्त सागराच्या प्रकोपाला आणि मानवाच्या लालचेला त्याच्या कळपामधले फारच थोडे देवमासे बळी पडले होते. आणि म्हणूनच त्या सर्वांचा म्होरक्या म्हणून त्याच्यावर पूर्ण विश्वास होता.

विशाल सागरसंग्रामामधला एक अनुभवी आणि विजयी योद्धा होता.

संग्राम आणि जलनिशा अल्पावधीतच विशालच्या कळपामध्ये रमले.

संग्राम आता आणखी मोठा झाला. तो त्याच्या वयाच्या इतर तरूण शिकाऱ्यांहून सडपातळ पण लांबसडक आणि शक्तिमान होता. तो सागराच्या पृष्ठभागावरल्या निळ्या–हिरवट लाटांवर मस्तीने लोळू लागला. इतर तरुण देवमाशांबरोबर खेळू लागला त्याचा लुटुपुटूचा पाठलाग करू लागला. त्यांच्या शेपट्यांचे गमतीने चावे घेऊ लागला.

चंद्र आणि चांदण्याच्या प्रकाशात रात्रीचा सागर चमकू लागला की संग्रामचा अनोखा खेळ सुरू होई. तो सागराच्या तरंगावर नाचणाऱ्या चंद्र-बिंबांचा पाठलाग करू लागे. त्याचे चावे घेण्याचा प्रयत्न करी. त्यावेळी सगळा कळप शांतपणे झोपी गेलेला असे. कळपातल्या देवमाशांच्या सावल्या सागराच्या अंतरंगामध्ये उमटलेल्या दिसत. फक्त विशाल जागृत असे. कळपाभोवती गस्त घालण्याचे त्याचे काम कधीच थांबत नसे.

कळपामध्ये बरेच तरुण नरशिकारी होते. पण त्या सर्वांना विशालची भीती वाटे. संग्राम मात्र विशालला घाबरत नसे. आपली प्रत्येक हालचाल विशाल टिपतो आहे याची त्याला पर्वा नसे. पण विशालला संग्रामचे अवखळ निष्काळजी चाळे पाहून त्याची काळजी वाटे. त्याला आपले बालपण आठवे. त्या बर्फाळ अपघाती मृत्यूपूर्वीचे दिवस त्याच्या डोळ्यासमोर येत. मग तो दीर्घ उसासे सोडत असे.

आज हिंमत जिवंत असता तरी तो संग्रामला शिकारी देवमाशांच्या

कळपाविषयी फारसे शिकवू शकला नसता. कारण त्याला स्वतःचा कळप एकत्र करण्याची संधीच मिळाली नव्हती. जलनिशा आणि नंतर संग्राम हेच त्याचे छोटेसे जग होते. पण विशाल 'वेगळा होता. म्होरकेपणाचे कौशल्य त्याच्यात होते. एका दमदार आदेशाबरोबर आपल्या कळपाचे रूपांतर शिस्तबद्ध सागरी लांडग्यांत करण्याचे सामर्थ्य त्याच्यात होते.

हिंमतचा मृत्यू आणि विशालची ओळख यांनी संग्रामच्या जीवनाला वेगळीच कलाटणी मिळणार होती.

विशालला समजे की कळपातले देवमासे आता भुकावले आहेत. मग तो त्यांना एकमेकांशी समांतर पोहण्याचा आदेश देई. त्यामुळे कित्येक किलोमीटर लांब अशी एक धनुष्याकृती लाट सागरावर धावू लागे प्रसंगी तो कळपाचा मार्ग नागमोडी करी. त्यामुळे कित्येक किलोमीटर सागराची चाळणी होई. श्वापदाचा सुगावा लागणे सोपे जाई.

तसे करूनही त्यांना भक्ष्य मिळाले नाही तर विशाल दुसऱ्याच युक्तीचा उपयोग करी. मग तो कळपाला बाणाच्या टोकाच्या आकारामध्ये पोहण्याचा आदेश देई. सर्वात पुढे विशाल आणि त्याच्या मागे दोन्ही बाजूला पोहणारे इतर शिकारी देवमासे ! अशाप्रकारे थोडीशीही शक्ती फुकट न घालवता त्याचा कळप कितीतरी दिवस पोहु शके. आणि मग शेवटी त्यांना भक्ष्य मिळेच !

मार्च महिन्यातील एक थंडगार सकाळी आली.

त्या सकाळी कळपातल्या एका मादीला सागराच्या तळावर एक भला मोठा पोलादी सांगाडा आढळला. तिने साद घालून विशालला बोलावले. त्याला तो सांगाडा दाखवला. विशालने कळपाला थांबण्याचा आदेश दिला. मग जोडी जोडीने शिकाऱ्यांनी सांगाड्या भोवतीच्या पाण्यात डुबक्या मारल्या. तिथल्या जांभळचा धूसर प्रकाशात शिकार करायला सुरवात केली.

तो सांगाडा एका मालवाहू जहाजाचा होता. ब्रिटनचे ते जहाज दुसऱ्या महायुद्धात उत्तर अटलांटिक महासागरावर युद्धसामुग्रीची ने आण

करी. एका काळोख्या रात्री ते जर्मन पाणबुडीच्या टॉर्पेडोंना बळी पडले होते.

आता सागरचरांनी तिथे घर केले होते. जहाजाच्या फुटलेल्या पोटामध्ये आणि वरच्या पोलादी जाळ्यांमधे जीवनाची पुनरुत्पत्ती झाली होती. प्रवाळ आणि शंखधारी मासे सगळीकडे पसरले होते. पाउटिंग, लिंग आणि कॉड माशांनी सांगाड्याच्या आत बाहेर फिरायला सुरवात केली होती. इतर वेगवेगळे मासे आणि स्विडनी तिथे ठाण मांडले होते. ऑक्टोपसनी डेकवर फिरायला सुरवात केली होती. खेकडे आणि लॉब्स्टरनी आसमंतातल्या सागरतळावर आक्रमण केले होते.

त्या सांगाड्याचा राजा होता–तीन मीटर लांबीचा एक अजगरासारखा जाड, लांबलचक कॉंगर ईल मासा! टॉर्पेडोने जहाजाचे पोट फाडून एक मोठाले भोक बनवले होते. तो त्या भोकात राहात असे. त्या भोकाच्या आसपासच्या छोट्या छोट्या खोल्यांमध्ये एके काळी जहाजाचे खलाशी राहिले होते. त्यांनी तिथे युद्धसमाप्तीची आणि घरी परतण्याची स्वप्ने रंगविली होती. पण आता ती स्वप्ने संपली होती. राहिला होता तो ओंगळ कॉंगरईल !

त्या कॉंगर ईलवर हल्ला करण्याचे धाडस कोणामध्येही नव्हते. उन्हाळ्यात तिथे पाच-सहा मीटर लांबीचे क्रूर शार्क मासेही यायचे पण तेही त्याच्या बिळात डोकावण्याचे टाळत.

आता बिळातला सुरक्षित अंधारामधून कॉंगर ईलने सांगाड्या भोवतालच्या पाण्यात होणारे वेगळेच आवाज ऐकले. शिकार करण्यात रममाण झालेल्या शिकारी देवमाशांचे स्वर त्याच्या कानावर पडले. पाण्यात पसरलेल्या रक्ताचा दर्प सांगाड्यामध्ये पसरला होता. तो त्या कॉंगर ईलच्या मस्तकात भिनला. कॉंगर ईल लालचावला, अखेरीस मृत्यूच्या आवाजाने आणि वासाने त्याला बिळातून बाहेर काढले.

तो सागराच्या तळावर पोहू लागला. त्याच्या चारी भोवती अर्धवट खाल्लेले माशांचे सांगाडे त्याला दिसले. खेकडे आणि लॉबस्टर अधाशाप्रमाणे त्या सांगाड्यावर तुटून पडले होते. कॉंगर ईलनेही त्या सांगाड्यांचा

फडशा पाडायला सुरवात केली. खेकडे आणि लॉबस्टरनी त्याच्या जाड कातडीवर ओरखडे काढले. पण काँगर ईलने त्याची पर्वा केली नाही.

काँगर ईल बराच वेळ जहाजाच्या सांगाड्याखाली सरपटत राहिला. मग एका शिकारी मादीने जांभळ्या खडकांवर सरपटणारी त्याची प्रचंड आकृती पाहिली. त्या अननुभवी मादीच्या तोंडाला पाणी सुटले. ती आकृतीच्या दिशेने सरसावली.

काँगरईलने शिकारी मादीला येताना पाहिले. त्याने आपल्या शरीराचे गुंडाळे केले. त्याचे पाण्यामध्ये तरंगणारे डोके लाटांवर डोलणाऱ्या बंद पिंपाप्रमाणे दिसू लागले. त्याचे डोळे मिणमिणे झाले. तोंड खद-खदू लागले.

शिकारी मादी त्याच्या जवळ पोहोचली. पण काँगर ईलची ओंगळ आकृती पाहून ती मनात बिचकली. मग तिने चोहोकडून येणारे तिच्या सोबत्यांचे आवाज ऐकले. तिला धीर आला. तिने आपला जबडा उघडला. तिचे शेपूटपंख हलले. तिने काँगर ईलवर झडप घातली.

शिकारीमादीला काँगर ईलची कोणतीच हालचाल जाणवली नाही. पण निमिषार्धात तिच्या जबड्यात तीव्र वेदना उफाळल्या.

काँगर ईलने अगदी चपळाईने तिच्यावर हल्ला केला होता. तिच्या उघडलेल्या तोंडातल्या जिभेचा लचका तोडला होता.

शिकारी मादी किंचाळली. तिने सागराच्या पृष्ठभागाकडे पलायन केले. तिच्या पाठोपाठ पाण्यात रक्ताची धार लागली.

विशालने त्या मादीची किंकाळी ऐकली. त्याच्या आदेशानुसार कळपाने शिकार थांबवली. त्याने दोन अनुभवी माद्यांना जखमी मादीची काळजी घ्यायला सांगितले. मग पाण्यातल्या रक्ताच्या धारेचा मागोवा घेत तो सागराच्या तळाकडे सरसरला. तिथे त्याचा अजस्र देह खडकांवर विसावला. त्याची संतापलेली पण थंडगार नजर पाण्यात भिरभिरू लागली.

पाण्यात बऱ्याच सावल्या दिसत होत्या. त्यांतली एक सावली थोडीशी हलली. विशालला काँगरईल दिसला- तो खदखदणारा उघडा जबडा,

किलकिले डोळे, अजगरासारखे जाडसर शरीर ! विशालचे शेपूटपंख हलले. त्याने काँगर ईलवर झडप घालण्याची तयारी केली.

अचानक काळोखात काहींतरी चमचमले, सरसरले. विशालच्या समोरची वाळू पाण्यात उफाळली. वाळूच्या पडद्यामागे आदळण्याचे, फटकाऱ्यांचे आवाज झाले.

मग वाळू परत सागरतळावर बसली. विशालच्या संतापलेल्या डोळ्यांना संग्राम दिसला. त्याच्या जबड्यातून काँगर ईलचा रक्तबंबाळ मृतदेह लोंबकळत होता.

विशालने झडप घालण्याआधीच त्याला वळसा घालून संग्रामने काँगर इलची शिकार केली होती.

विशालच्या थंडगार डोळ्यांत कौतुकाची निशाणीही नव्हती. त्याने संग्रामला शाबासकीही दिली नाही. पण संग्रामने त्याच्यावर छाप मारली होती.

आणि अनुभवी विशालला त्याच्यावर छाप टाकणारा नरशिकारी कित्येक वर्षांत भेटला नव्हता.

□

## ॥ सहा ॥

संग्रामचा विशालच्या कळपाबरोबरचा जल प्रवास परत सुरू झाला.

कळपाच्या मार्गामध्येच एक निळ्या देवमाशाची मादी आणि तिचे बच्छडे पोहत होते. निळा देवमासा हा जगातला सर्वात प्रचंड प्राणी आहे. त्याची लांबी तीस मीटर असते आणि वजन एकशे पन्नास टन! त्याचे मुख्य खाद्य क्रिल नावाचे मासे असतात. शिकारी देवमाशांना असणारे भयानक सुळे त्यांच्या जबड्यात नसतात. क्रिल माशांना खाता येणारे केस असतात! त्यामुळे सागरचर त्यांना फारसे भीत नाहीत. पण एका धडकी-मध्ये कोणत्याही सागरचराच्या चिंधड्या उडवण्याची अफाट शक्ती मात्र त्यांच्यामध्ये असते. त्यामुळे सहसा कोणी त्यांच्या वाटेला जात नाही.

त्या दिवशी निळ्या देवमाशांच्या मादीने आणि बच्छड्याने त्यांच्या दिशेने येणारा पन्नास डॉलफिनचा एक कळप पाहिला. ते डॉलफिन नेहमी-प्रमाणे एकमेकांशी आणि लाटांशी खेळत चालले होते. निळे देवमासे सागराच्या पृष्ठभागावरच पोहत होते. त्यांना पाहून ते डॉलफिन भ्याले नाहीत. पण एखाद्या बेटाप्रमाणे दिसणाऱ्या प्रचंड निळ्या मादीच्या रस्त्यात न येण्याचा शहाणपणा मात्र त्यांच्यात होता. त्यांनी ताबडतोब वाट मोकळी केली. मादीला आणि तिच्या बच्छड्याला पोहताना अडथळा येऊ नये म्हणून! मग आपल्याच गीतात मश्गूल झालेले ते डॉलफिन निघून गेले.

निळ्या देवमाशाचे बच्छडे फक्त आठ दिवसांचे होते. त्याला आनंद

झाला. त्याने अभिमानाने आपल्या प्रचंड मातेकडे बघितले. सागरावरच्या सर्वांत शक्तिमान प्राण्याच्या जातीत जन्मण्याचे भाग्य त्या बछड्याला लाभले होते. पण तो अजूनही 'बच्चा' होता.

मादी अनुभवी होती. तिने बछड्याला जन्म देण्याच्या दोन दिवस आधीच तिचा सखा बळी पडला होता-एका शिकारी जहाजाच्या बरचीला !

त्या दिवशी ते दोघेही क्रिल माशांच्या शोधात होते. त्या गडबडीत मादीने जहाजांच्या इंजिनाची घरघर ऐकली. ती घाबरली. तिने आपल्या सख्याला साद दिली. तो ताबडतोब सागराच्या पृष्ठभागावर आला. त्याने पाहिले की ते जहाज मादीच्या दिशेने चालले होते. मादी अजूनही पाण्या-खालीच होती.

नराने पाण्याच्या पृष्ठभागावरून ताशी पस्तीस किलो मीटर वेगाने मादीकडे पोहायला सुरवात केली. मादीही पाण्याच्या पृष्ठभागावर आली. तिचा सखा आता अगदी जवळ आला होता.

आणि मग तो भयंकर आवाज तिने ऐकला. स्फोटक, किळसवाणा ! पाण्यामध्ये हाडांचे तुकडे, मांस आणि रक्ताचे लोट पसरले. जहाजावरच्या बरचीने तिच्या सख्याच्या गर्दनीचा वेध घेतला होता. त्याने पाण्यात डुबकी मारण्याचा प्रयत्न केला. पण त्याच्या एका मणक्याच्या चिंधड्या उडाल्या होत्या. त्याला शेपूटही हलवता आली नाही. त्याच्या मस्तकामधून रक्ताचा एक फवारा उडाला. बरचीला बांधलेल्या नायलॉनच्या दोराने त्याला भरभर ओढून घ्यायला सुरवात केली.

मादी बरचीच्या माराच्या पल्ल्याबाहेर होती. तिने आपल्या सख्याचे अजस्र पोट पाण्यावर येताना पाहिले. तो अगदी निचेष्ट पडला होता.

मादीला मृत्यूची ओळख होती. आपल्या सख्याचा प्राण त्याचा देह सोडून गेला आहे हे तिने जाणले. तसे नसते तर ती त्याच्या मागे मदती-साठी धावली असती. पण आता त्याचा काही उपयोग नव्हता.

तिला आपल्या पोटातील गर्भाची आठवण झाली. त्याच्यासाठी

जगणे तिला आवश्यक होते. तिने शिकारी जहाजाच्या विरुद्ध दिशेने सरसरायला सुरवात केली. पाण्याखालून जहाजाने तिचा पाठलाग करू नये म्हणून.

त्यानंतर दोनच दिवसांनी तिने साडेतीन मीटर लांबीच्या बछड्याला जन्म दिला. त्याला बरोबर घेऊन ती सागरसंग्रामाला सज्ज झाली.

डॉलफिन मासे आता दूर निघून गेले होते. निळ्या देवमाशांच्या मादीला पाण्याखाली क्रिल माशांचा सुगावा लागला. तिने बछड्याला आपल्या मागोमाग येण्याचा आदेश दिला. त्याला एकटे सोडण्याचा धोका तिला टाळायचा होता. दोघांनीही दोन चार फवारे सोडून पाण्याखाली डुबकी मारली.

पाण्याच्या पृष्ठभागाखालच्या अंधुक प्रकाशात पोहणारा हजारो क्रिल माशांचा एक थवा मादीला दिसला. तिने थव्यावर झडप मारली. तिचा जबडा उघडला. तिच्या जबड्यातील केसांमध्ये शेकडो क्रिल मासे येऊ लागले. तिच्या प्रचंड जिभेने त्यांना आत ओढून घ्यायला सुरवात केली. पाहता पाहता त्या थव्याचा फडशा उडाला.

मादीची मेजवानी तिच्या बछड्याने विस्फारलेल्या डोळ्यांनी बघितली.

आणि मग ती मादी एकदम दचकली.

आता त्यांना सागराच्या पृष्ठभागाकडे जायचे होते. आणि त्याच-वेळी तिने पाण्यामध्ये एक भयानक सळसळ ऐकली–एकसारखी, मंद, पण दमदार ! बछड्याने ते आवाज पूर्वी ऐकले नव्हते. पण तेही भीतीने गर्भ-गळित झाले पण त्याच्या मातेला मात्र त्या आवाजाची ओळख होती – आणि त्यांनी आणलेल्या मृत्यूच्या संदेशाचीही !

तो आवाज विशालच्या कळपाचा होता. एका बरोबर एक समांतर अशा रीतीने त्याचा कळप पोहत होता.

विशालच्या प्रतिध्वनींच्या तरंगाचा वेध घेणाऱ्या यंत्रणेने निळ्या

देवमाशांच्या मादीचे आणि तिच्या बछड्याचे अस्तित्व टिपले होते.

निळ्या देवमाशांच्या त्या मादीने जाणले की शिकारी देवमाशांचा कळप दक्षिणेकडून येत होता. तिच्यापुढे एकच मार्ग होता. आपल्या बछड्याला पाठीवर घेऊन पाण्याखालूनच तिरप्या दिशेत उत्तरेकडे जायचे. आणि मग पाण्याच्या पृष्ठभागावर जायचे. तोपर्यंत शिकारी देवमाशांचा कळप त्यांच्यापुढे उत्तरेला निघून गेला असता मग आपण दक्षिणेकडे पोहत जायचे–शिकाऱ्यांपासून दूर !

तिने बछड्याला आदेश दिला आणि मग ते प्रथम सागराच्या तळाला समांतर पोहू लागले. त्यांच्या शरीरात आता फारच थोडा ऑक्सिजन शिल्लक होता. त्यांची फुप्फुसे जळजळू लागली. बछड्याला ते सहन होईना. वेगाने सागराच्या पृष्ठभागावर उसळून श्वास घेण्यासाठी ते धडपडू लागले. पण त्याच्या मातेने त्याला तसे न करण्याचा इशारा दिला.

सागराच्या पृष्ठभागावरचे शिकाऱ्यांचे आवाज आता अगदी स्पष्ट ऐकू येत होते.

अनुभवी विशालला सागराच्या पृष्ठभागाखाली काय चालले आहे ते समजले. त्याने कळपाला पोहत राहण्याचा आदेश दिला. कळप पोहतच राहिला. विशाल मात्र थांबला. त्याच्यापासून काही अंतरावर पोहणारा संग्रामही थांबला. विशालचा आदेश त्याने धुडकावून लावला होता. विशालच्या शिकारीत भाग घेण्याच्या अनिवार इच्छेने त्याचा ताबा घेतला होता. विशालने संग्रामकडे दुर्लक्ष केले.

पाण्याखाली बछडे वर येण्यासाठी धडपडत होते. मादी त्याला थांबण्यासाठी आर्जवत होती. दटावत होती. शेवटी शिकारी माशांच्या उत्तरेकडे जाणाऱ्या कळपाचे आवाज तिने ऐकले. तिचा जीव भांड्यात पडला. तिने सागराच्या पृष्ठभागाकडे सरसरायला सुरवात केली. बछडे तिच्या मागोमाग धावले.

मादी आणि बछडे पाण्यावर आले. मादीने पाहिले– उत्तरेला शिकाऱ्यांचा कळप दूरवर निघून गेला होता. तिने सुटकेचा निश्वास सोडला. पाण्याचे दोन फवारे सागरावर उफाळले.

विशालने ते सर्व पाहिले. मग त्याने मोठाल्या आवाजात दूरवर गेलेल्या कळपाला साद घातली. त्यांना थांबण्याचा आणि परत फिरण्याचा आदेश दिला.

निळ्या देवमाशाच्या मादीला आपली फसगत झाली आहे हे समजले. एका बाजूला विशाल आणि संग्राम तर दुसऱ्या बाजूला सगळा कळप! आता ती काय करणार ? आपल्या बछड्यांचे रक्षण कसे करणार ? तिने ओळखले की सगळे काही संपले होते !

पण तिने काहीतरी करायचे म्हणून विशालला धडक द्यायचे ठरवले. ती मागे वळली आणि विशालवर चालून गेली. तिच्या बछड्याला काहीच समजले नव्हते. पण काहीतरी भयानक घडणार हे मात्र त्याने जाणले.

निळ्या देवमाशाची मादी विशालहून आकाराने तिप्पट मोठी होती. विशालने तिची धडक सहजगत्या चुकविली. मादीने ओळखले की मृत्यू आता तोंडाशी आला होता. ती परत फिरली आणि आपल्या बछड्याकडे जाऊ लागली. त्याला कुशीत घेण्यासाठी !

तिच्या मनामध्ये भावनांचे वादळ उठले होते. तिचा डाव फसला होता आपला आणि आपल्या बछड्याचा प्राण गमावण्याचे संकट तिच्यासमोर उभे ठाकले होते.

एव्हाना विशाल तिच्या बरोबरीने पोहू लागला होता. शिकारी देवमासे निळ्या देवमाशाहून दुप्पट वेगाने पोहू शकतात. बघता बघता विशाल त्या मादीवर झेपावला. त्याने तिचा जबडा आणि जिभेचा एक मोठाला लचका तोडला. मादीच्या मस्तकात वेदनांची आग उसळली. ती डावीकडे वळू लागली.

पण आतापर्यन्त संग्राम तिला भिडला होता. त्याने डाव्या बाजूने मादीवर हल्ला चढविला. तिचा डावा डोळा आणि मस्तकाचा काही भाग त्याने फाडून काढला.

वचावलेल्या उजव्या डोळ्याने मादीने आपल्या बछड्याला शेवटचे पाहून घेतले.

सागराच्या पाण्यात आता रक्त मिसळले होते मासाचे तुकडे पसरले

होते. एक भयानक खळबळ सुरू झाली होती. विशालचा कळप आता तिथे पोहोचला होता. दुर्दैवी मादीने मृत्यूपुढे शरणागती पत्करली. ती सरळ पाण्यावर उपडी झाली. तिचे अजस्र पांढुरके पोट पाण्यावर आले. ती शिकाऱ्यांच्या शेवटच्या हल्ल्याची वाट पाहू लागली.

सृष्टीतल्या सर्वात प्रचंड आणि शक्तिमान जातीची मादी होती ना ती ! पण शिकाऱ्यांनी तिचीही शिकार केलीच ! ती सुदैवी होती. तिला अग दोन क्षणच वाट पहावी लागली. चारी बाजूंनी शिकारी तिला भिडले.

चार सहा मिनिटांत त्यांनी तिची फडफड कायमची संपवून टाकली!

पण तिचे बछडे मात्र तितके सुदैवी नव्हते. त्याने भेदरलेल्या डोळ्यांनी आपल्या मातेची ती भयानक कत्तल बघितली. तिच्या रक्ताच्या पाण्यावर पसरलेल्या दर्पाने ते भडभडा ओकू लागले. धडपडू लागले. फडफडू लागले.

एक दोन शिकाऱ्यांनी आपला मोर्चा त्या बछड्याकडे वळवला. बछड्याने त्यांना येताना पाहिले. त्याने एक आर्त किंकाळी मारली. आणि मग भय आणि वेदनेने ते वेडेपिसे झाले– फक्त दीड–दोन मिनिटापुरते !

त्या मादीचा जीवनसंग्राम आता संपला होता. आणि तिच्या बछड्याचाही– सुरू होण्याआधीच !

मेजवानी संपली. विशालने कळपाला परत उत्तरेला फिरण्याचा आदेश दिला !

संग्रामने दोन वर्षांहून अधिक काळ विशालच्या कळपात घालवला. नवनवीन अनुभव घेत ! विशालचे निरीक्षण करत ! अनुकरण करत !

मग एके दिवशी त्याची कळपाला निरोप घेण्याची वेळ आली.

वसंत ऋतूची ऊब सागरावर पसरू लागली होती. संग्राम आणि त्याच्या समवयस्क तरुण शिकाऱ्यांचे रूपांतर आता नरांमध्ये होऊ लागले. त्यांच्या पोटात एक वेगळीच आग पेटली. ते आपसात लुटूपुटूच्या लढाया खेळताना एकमेकावर जोराने हल्ले करू लागले– अगदी सुळे विचकून. रागाने !

विशालने हे सगळे बघितले. मग तो एखादा तरुण नरशिकारी जखमी होण्या आधीच ती भांडणे थांबवू लागला. त्याच्या दमदार आदेशानेच ते तरुण बंडखोर भानावर येऊ लागले. पण कधी कधी विशालला आपल्या शारीरिक शक्तीचाही वापर करावा लागू लागला. तो एखादी धडक देऊन त्या झुंजी संपवू लागला.

पण हळू हळू विशालची सहनशक्तीही संपुष्टात येऊ लागली.

संग्राम आता खरोखरच मोठा झाला. त्याची लांबी जवळजवळ आठ मीटर झाली होती. त्याची पाठ अगदी रुंद झाली होती. त्याच्या पाठीवरचा पंख सरळताठ आणि भक्कम होऊ लागला होता.

तरुण माद्यांशी खेळताना तो त्यांच्याशी लगट करू लागला. रात्रीच्या अंधारामध्ये तो आक्रमक बनू लागला. जोरजोरात गुरगुरू लागला.

ते सगळे विशालच्या नजरेतून सुटले नव्हते. पहिल्यांदा त्याने ते पाहिले न पाहिल्यासारखे केले. मग एका रात्री त्याने निर्णय घेतला.

तो एप्रिलचा महिना होता. एका भल्या पहाटे संग्राम उठला. त्याला विशालचे अजस्र करडे धूड आपल्या दिशेने येताना दिसले.

संग्रामच्या शरीरातल्या बदलाने कडवटपणा आणि तिरस्कार त्याच्या मेंदूमध्ये भिनवला होता. त्याने आपले शेपूटपंख हलवले. आणि सरळ विशालवर हल्ला केला पाण्यात एकच खळबळ उडाली.

बलाढ्य आणि अनुभवी विशालने अगदी सहजगत्या तो हल्ला परतवला. संग्राम आणखीनच चिडला. त्याने एकामागून एक हल्ले केले. पण विशालने ते सर्व हल्ले विफल ठरवले. शेवटी त्याने संग्रामच्या बगलेत एक जबर धडक मारली. संग्राम शुद्धीवर आला.

त्याच्या लक्षात आले की विशालच्या डावपेचासमोर आपला निभाव लागणार नाही.

संग्रामने आंधळ्यासारख्या सरळसरळ धडका मारल्या होत्या. पण विशालला आपण काय करतो आहोत हे माहीत होते. त्याच्या जवळ वर्षानुवर्षाच्या सागरसंग्रामाचा अमूल्य अनुभव होता.

शेवटी संग्रामने आपले हल्ले थांबवले. त्याने एकवार विशालकडे टक लावून बघितले. विशालची थंडगार नजर त्याच्या नजरेला भिडली संग्रामने जलनिशेला डोळे भरून पाहिले. मग त्याने कळपाकडे पाठ फिरवली.

त्याने पाचूसारख्या हिरव्यागार पाण्यामध्ये पोहायला सुरुवात केली. विशाल आणि जलनिशा यांनी खूप वेळ दूरवर जाणारी त्याची आकृती बघितली. संग्राम लहान लहान होत गेला. शेवटी दिसेनासा झाला.

त्याच्या सरसरण्यामुळे होणारे आवाजही लाटांनी गिळून टाकले.

संग्रामला आता एकट्याने सागरसंग्राम करायचा होता !

□

## ॥ सात ॥

जीवनामध्ये पहिल्यांदाच संग्राम एकटा होता. अगदी एकटा !

त्याने साद घातली. तो म्हणाला—मी एक नरशिकारी आहे. एकटा! अगदी एकटा !

पण त्याच्या सादीला कोणीच उत्तर दिले नाही. त्याच्या कानांवर आवाज पडले ते फक्त उचंबळणाऱ्या लाटाचे ! सागरावर भिरभिर-णाऱ्या वाऱ्याचे !

वसंत ऋतूला नुकतीच सुरवात झाली होती. वसंताच्या आकर्षक रंगांची उधळण आकाशात झाली होती. संग्रामने उत्तरेच्या आकाशाकडे पाहिले. त्याच्या हृदयाला भरती आली. त्याच्या भावना सागराच्या लाटा-प्रमाणेच उचंबळू लागल्या. जसे काही कोणी त्याला उत्तरेकडे आर्जवून बोलवत होते. साद घालत होते.

त्याने रात्रीच्या आकाशामध्ये ध्रुव तारा पाहिला आणि मग कसल्या-तरी अनिवार ओढीने त्याला उत्तरेकडे खेचले. त्याने ध्रुव ताऱ्याच्या दिशेने क्षितिजाकडे पोहायला सुरवात केली.

त्याच्या समोर नॉर्वेच्या उत्तरेचा सागर पसरला होता- थंडगार आणि नेहमी उफाळणारा ! पाण्याच्या मोठाल्या, लांबलचक लाटा त्याच्या पाठीवरून घरंगळू लागल्या. त्या त्याच्या सरसरणाऱ्या शेपटीवर आदळून फुटू लागल्या. फेसाळून मागे पडू लागल्या.

संग्रामला पाण्याच्या पृष्ठभागावर फारसे खाद्य मिळेनासे झाले. मग त्याने पाण्याखाली डुबकी मारायचे ठरवले.

त्याने आपल्या मस्तकातून एकदा, दोनदा, चारदा पाण्याचे फवारे बाहेर सोडले. त्याची फुप्फुसे रिकामी झाली. मग तो एका प्रचंड लाटेच्या शिखरावर चढला त्याने नाक खाली केले. शिखरापलीकडे डुबकी मारली. तो अटलांटिक महासागराच्या तळाकडे उतरू लागला. सगळीकडे थंडगार पाणी ! मुलायम अंधःकार ! आणि प्रगाढ शांतता !

तो जसजसा खोल पाण्याकडे जाऊ लागला तसतसा त्याच्या शरीरावरचा पाण्याचा दाब वाढू लागला. निसर्गाने त्या दाबाचा प्रतिकार करण्यासाठी बनविलेली त्याची शरीरयंत्रणा काम करू लागली. त्याच्या 'तरंगत्या' बरगड्या आतल्या बाजूला कोलमडल्या. त्याची फुप्फुसे आकसू लागली, दुमडली, जळजळू लागली. पण अल्पावधीतच ती जळजळ थांबली. त्याच्या कानांमध्ये ध्वनितरंगांनी गुंजारव करायला सुरवात केली. पण थोड्याच वेळात तो गुंजारवही थांबला.

सागराच्या तळावर सर्वत्र खडकांनी ठाण मांडले होते. गाळाचा जाडसर तळ त्या खडकांवर पसरला होता. संग्राम अगदी तिथपर्यंत पोहोचला.

आता त्याने सागरतळावर शिकारीला सुरवात केली. तो चोहीकडे टेहळणी करू लागला. फिरू लागला. रेंगाळू लागला. त्याने ध्वनितरंग सोडायला सुरवात केली. तो प्रतिध्वनींचा वेध घेऊ लागला.

त्याला भरपूर 'स्क्विड' खायला मिळू लागले. त्यांची लांबी पंधरावीस सेंटीमीटरपासून पंधरा-सोळा मीटरपर्यंत असते. ते शिकारी देवमाशांना हुलकावणी देण्यासाठी एक विशिष्ट युक्ती वापरतात. आपल्या शरीरातून शाईसारखा काळसर द्रव पाण्यात सोडतात. त्यामुळे शिकाऱ्याला स्क्विड दिसत नाहीत त्याचा फायदा घेऊन ते निसटतात.

आता संग्रामने सागराच्या तळाकडे फैलावत जाणाऱ्या स्क्विडच्या थव्यांची शिकार करायला सुरवात केली. एकदा त्याला पंधरा मीटर लांबीचा एक भला मोठा स्क्विड दिसला. संग्रामने त्याचा चावा घेण्याआधीच त्या स्क्विडने त्याच्या शरीराभोवती आपल्या सोंडांनी विळखा घातला. संग्रामला तो प्रसंग नवखा होता. शिवाय स्क्विडची भीती त्याला कधीही

वाटायची नाही. आणि तो विळखाही हळूवार होता. मुलायम !

पण क्षणार्धातच त्या स्क्विडची संग्रामच्या शरीरावरची पकड भक्कम झाली. इतकी भक्कम की संग्रामला आपण चिरडून जातो की काय असे वाटू लागले. तो स्क्विड संग्रामला सागर तळावरून फरफरत ओढून नेऊ लागला.. संग्रामने आपले शेपूटपंख हलवण्याचा प्रयत्न केला. पण त्याचे पंखही स्क्विडच्या पकडीत सापडले. संग्रामच्या मेंदूमध्ये भयंकर धास्तीचे सावट पसरले. त्याला काहीच हालचाल करता येईनाशी झाली.

संग्रामने जीवाच्या आकांताने एक जोरदार मुसंडी मारली. तो कसा-तरी मागे वळला आणि त्याने त्या स्क्विडच्या अंगाचा चावा घेतला. त्याला हिसके मारायला सुरवात केली. ती झुंज बराच वेळ चालू राहिली. तोवर संग्रामच्या शरीरातला ऑक्सिजन भरभर संपू लागला. अखेर त्या स्क्विडच्या सोंडांनी संग्रामची सुटका केली. संग्राम आंधळ्यासारखा सागराच्या पृष्ठ-भागाकडे धावला श्वास घेण्यासाठी !

त्याला वाटले, तो सागराच्या पृष्ठभागावर कधीच पोहोचू शकणार नाही. त्याच्या शरीरात ऑक्सिजनच शिल्लक नव्हता. एका आगळ्याच दावाने त्याच्या मेंदूची पकड घेतली. तो भरभरतच राहिला. त्याने साग-राच्या पृष्ठभावर उसळी मारली. श्वास घेतला. हळूहळू त्याच्या मेंदू-वरचा दाब कमी झाला. त्याच्या जीवात जीव आला.

सागराच्या प्रत्येक कोपऱ्या कोपऱ्यात शत्रूंची रेलचेल होती. आणि संग्राम एकटा होता ! अगदी एकटा !

संग्रामने परत साद घालायला सुरवात केली- मी एक तरुण नर-शिकारी आहे. एकटा ! अगदी एकटा !

संग्राम होता तिथून कांही किलोमीटर अंतरावर शिकारी देवमाशाचे एक कुटुंब होते त्या कुटुंबात तीन बछडी होती. त्यातल्या एका मादीने नुकताच तारुण्यात प्रवेश केला होता.

तिचे नाव होते श्वेतप्रभा !

श्वेतप्रभेने संग्रामची हाक ऐकली. तिचे हृदय त्याच्याकडे धाव घेऊ लागले. आपले आई-वडील खोल सागरात डुबक्या मारत आहेत. हे तिने पाहिले. तिची लहानगी भावंडे सागराच्या पृष्ठ भागावर खेळत होती. तिनेही दोन-चार क्षण त्यांच्या बरोबर खेळण्यात घालवले.

मग श्वेतप्रभेला परत संग्रामची साद ऐकू आली.

श्वेतप्रभेने खेळायचे थांबवले. एकदम वळून ती त्या सादेच्या दिशेने पोहू लागली. तिच्या भावंडांना आश्चर्य वाटले. त्यानी तिचा पाठलाग करण्याचा प्रयत्न केला, पण ती त्यांना सापडली नाही.

थोडे अंतर कापल्यावर तिने संग्रामला साद घातली. तिला म्हणायचे होते- थांब जरासा - - मी येते आहे !

संग्रामने श्वेतप्रभेची साद ऐकली. तो थांबला. एका अननुभूत भावनेचे स्फुल्लिंग त्याच्या शरीरात उडू लागले.

त्याला सागरावर पसरलेल्या धुक्यातून येणारी श्वेतप्रभा दिसली. ती अगदी जवळ आली. तो तिच्याशी कुजबूजू लागला. ती त्याला प्रत्युत्तर देऊ लागली.

संग्रामने तिच्या कानाजवळ आपल्या तोंडाने गुदगुल्या केल्या. तिच्या शरीराला स्पर्श केला. श्वेतप्रभेची अजूनही पूर्ण वाढ झाली नव्हती.

नरशिकारी देवमासे कोणत्याही मादीला जवळ करत नाहीत. ते काही काळ प्रणयाराधनेत घालवतात. एकमेकांचा स्वभाव समजावून घेतात. आणि मगच त्यांचे मिलन होते. त्यांची साथ जन्मभराची असते. सागर-संग्रामसाठी तसली सोबत आवश्यक असते.

संग्राम परत उत्तरेकडे पोहू लागला. श्वेतप्रभेला बरोबर घेऊन !

संग्राम आणि श्वेतप्रभा यांनी अटलांटिक महासागराची उत्तर सीमा ओलांडली. त्यांनी आर्क्टिक महासागरामध्ये प्रवेश केला. आता त्यांना मार्ग-दर्शन करणारा ध्रुव तारा आकाशात दिसत नव्हता. पण वायव्येकडून

येणाऱ्या ऊबदार पाण्याच्या प्रवाहांनी त्यांना उत्तरेकडे ढकलायला सुरवात केली.

कित्येक दिवस त्यांचा सागरप्रवास चालू राहिला.

आणि मग एका स्वच्छ, झगमगत्या सकाळी त्यांना थंडगार पाण्यामध्ये तरंगणारे बर्फाचे तुकडे दिसले. त्या तुकडयांची सूर्यप्रकाशातील चमचम बघण्यासाठी संग्राम आणि श्वेतप्रभा परत परत सागराच्या पृष्ठभागावर येऊ लागले. संग्रामने एका छोटयाशा बर्फाच्या तुकडयाला धक्का दिला. त्या तुकडयाचे हजारो चकमकते तुकडे हवेत उडाले. श्वेतप्रभेने एका दुसऱ्या तुकडयाला टक्कर मारली. तिच्या मस्तकावर हजारो झगमगते बर्फाचे तुकडे उधळले.

त्यांनी आता मध्यरात्रीच्या सूर्याच्या प्रदेशात प्रवेश केला होता ! उत्तर ध्रुवाच्या जवळ ! वातावरण आणि सागर आणखीन थंड झाला' मध्यरात्रीचे आकाश धूसर केशरी रंगात न्हाऊन गेले. आणि त्या आकाशाखाली संग्रामला आणि श्वेतप्रभेला उत्तर ध्रूवाजवळचे पहिले वहिले तरंगते हमपर्वत दिसले. त्यांनी दोन तरंगत्या हिमपर्वतांमधल्या मोकळ्या जागेमध्ये पोहायला सुरवात केली.

पण ते दोघेही त्या भागात नवखे होते. सागराच्या पृष्ठभागाखाली चारशे मीटर खोलीवर ते आता पोहत होते. त्यांनी समोर पाहिले की बर्फाचे ते दोन प्रचंड तुकडे एकत्रित येत होते. त्यांची वाटच बंद होत होती. संग्रामने श्वेतप्रभेला आदेश दिला. त्यांनी आणखी खोल पाण्यामध्ये डुबकी मारली. हिमपर्वत संपताच सागराच्या पृष्ठभागावर येऊन श्वास घेण्याचा संग्रामचा विचार होता.

पण ते हिमपर्वत संपतच नव्हते. श्वेतप्रभा आता घाबरून गेली केव्हा एकदा आपण सागराच्या पृष्ठभागावर येतो असे तिला वाटू लागले. तिच्या फुप्फुसांमधली जळजळ असह्य होऊ लागली. संग्रामने तिला धीर दिला. ते वेगाने पुढे पुढे सरसरू लागले.

संग्रामने वरती पाहिले. दोन्ही हिमपर्वत आता जुळले होते. त्यांचा एकच प्रचंड हिमपर्वत बनला होता. भीतीने त्याच्या मेंदूची पकड घेतली

त्याचे शरीर आता श्वेतप्रभेच्या शरीराला स्पर्श करत होते. तिच्या वेदना त्याला समजत होत्या.

आणि अखेर हिमपर्वताचा किनारा त्यांच्या नजरेस पडला. ते सर्व शक्ती पणाला लावून पोहू लागले. पाण्याच्या पृष्ठभागावर उसळले. धपधपून श्वास घेऊ लागले.

मग ते सागराच्या पृष्ठभागावर अगदी शांतपणे पडून राहिले संग्रामने आपला एक मोठाला शेपूटपंख श्वेतप्रभेच्या खांद्यावर अलगदपणे ठेवला. श्वेतप्रभा सुखावली. तिला संग्रामच्या सान्निध्यामध्ये सुरक्षितता भासू लागली. त्याच्याविषयी प्रेम वाटू लागले.

संग्राम आणि श्वेतप्रभेने परत उत्तर ध्रुवाच्या दिशेने पोहायला सुरवात केली.

संग्रामने शिकार करायला सुरवात केली. श्वेतप्रभेला आता अन्नाची जास्त गरज होती. कारण त्यामुळे तिची चरबी वाढणार होती. आणि मग एखादे नवे बछडे त्यांच्या जीवनात आले तर त्याचे पोषण करणे सोपे जाणार होते. कारण आता श्वेतप्रभेची पूर्ण वाढ झाली होती.

मग एके दिवशी सकाळी संग्रामला श्वेतप्रभेच्या वागण्यात आगळाच बदल दिसला. जणू ती म्हणत होती— माझ्या जवळ ये रे लवकर !

संग्रामच्या शरीरात एक वैशिष्टयपूर्ण बदल घडून आला. त्याच्या सर्वांगातून जसे विद्युतकिरण सळसळू लागले. त्याने भरभर सरसरायला सुरवात केली. कधी श्वेतप्रभेपासून दूर, तर कधी तिच्या अगदी जवळ ! कधी तिच्या पोटाखालून, तर कधी तिच्या पाठीवरून ! कधी तिच्या समोरून, तर कधी तिच्या मागोमाग !

श्वेतप्रभाही संग्रामला खेळकरपणे हुलकावण्या देऊ लागली. आणि मग साथही ! सागर जणू त्यांचे क्रीडांगण बनला. ते एकत्र वर उफाळू लागले. पाण्यात उसळ्या मारू लागले. गरगरा फिरू लागले. डुबक्या मारू लागले. त्यांच्या अनोख्या खेळाने सागराच्या अंतरंगामध्ये एक वेगळीच खळबळ

माजली. सागराच्या पृष्ठभागावर आगळेच तरंग उमटू लागले.

संग्राम आणि श्वेतप्रभा सागराच्या पृष्ठभागावर आले. त्यांनी एकमेकाभोवती वर्तुळामध्ये फिरायला सुरवात केली. त्यांच्या मनामध्ये प्रेमभावनांचे कल्लोळ उमटले. हळूहळू ते वर्तुळ लहान होऊ लागले.

त्यांची शरीरे एकमेकांना स्पर्श करू लागली. त्यांच्या मेंदूमधल्या भावनांचे पडसाद त्यांच्या ओटीपोटामध्ये उमटू लागले. ते त्या पडसादांनी मुग्ध झाले, वेडे पिसे झाले. त्यांची शरीरे एकत्रित आली.

तोंडाला तोंड, पोटाला पोट आणि शेपटीला शेपटी लावलेली त्यांची शरीरे आनंदातिरेकाने पाण्याबाहेर उसळली. सूर्याच्या तांबूस किरणांनी त्यांना गुलाबी रंगामध्ये धुऊन काढले. एक क्षणभर ती दोन शरीरे हवेमध्येच स्थिर राहिली. आणि मग एकत्रितपणे परत सागराच्या पाण्यात कोसळली. पाण्याचे तुषार सागरावर हजारो हिऱ्यामोत्यांप्रमाणे झगमगले. आणि मग सागराच्या अथांगतेत हरवून गेले.

संग्राम आणि श्वेतप्रभेच्या प्रणयराधनाची सांगता झाली होती. त्यांचे प्रथम मीलन झाले होते.

सागराच्या मखमली पृष्ठभागावर संग्राम आणि श्वेतप्रभा विसावले. त्यांची शरीरे अजूनही एकत्रितच होती. त्यांच्या स्पर्शाला आता तृप्तीची आणि प्रेमाची महिरप लाभली होती.

काही वेळाने त्या युगुलाने परत चळवळायला सुरवात केली. प्रथम मीलनाची उत्सुकता आणि तृप्ती आता संपली होती. तो अननुभूत आनंद परत चाखण्यासाठी ते आसुसले होते.

श्वेतप्रभा अगदी मंद गतीने पाण्यातून सरसरू लागली. संग्राम तिच्या मागोमाग जाऊ लागला. त्याच्या मनात एकच इच्छा होती—श्वेतप्रभा आपल्या नजरेआड होऊ नये ! पण थोड्याच वेळात त्यांच्या भावनांना भरती आली. तो श्वेतप्रभेच्या बरोबर पोहू लागला. तिचे हळूवार चावे घेऊ लागला. श्वेतप्रभा त्याच्यापासून दूर दूर जाऊ लागली. त्याला हुलकावण्या देण्याचा खेळ तिने परत आरंभला.

त्यांनी एकमेकांभोवती वर्तुळामध्ये फिरायला सुरवात केली. त्यांच्या भावनांचा आवेग अधिकच वाढला. त्या वर्तुळाचा परीघ लहानलहान होऊ लागला. त्यांनी पाण्यावर शेपट्या आपटायला सुरवात केली त्यांची शरीरे धनुष्याकृती होऊ लागली. ते त्या वर्तुळाच्या अगदी मध्यावर आले. पाण्यामध्ये एकच खळबळ उठली.

संग्राम आणि श्वेतप्रभेची शरीरे परत एकमेकांना स्पर्श करू लागली. मीलनाच्या आसक्तीने त्यांची मने पेटून उठली. त्यांना आसमंताचा विसर पडला.

सागराच्या त्या भागात सहा मीटर लांबीचा एक सोअर्डफिश पोहत होता. सोअर्डफिश म्हणजे डोक्यापुढे तलवारीच्या पात्यासारखा एक अगदी कठीण, धारधार आणि अणकुचीदार अवयव असणारा मासा. त्या सोअर्ड फिशच्या तलवारीची लांबी तीन मीटर होती. जवळ जवळ त्याच्या शरीरा इतकीच !

संग्राम आणि श्वेतप्रभेच्या प्रणयचाळ्यांनी उफाळलेली खळबळ सोअर्डफिशने ऐकली. तो त्या युगुलाच्या अगदी जवळ आला. पण पाण्यात उठणाऱ्या बुडबुड्यांमुळे त्याला काहीच दिसले नाही. त्याला आपल्या इतक्या जवळ खळबळ करणाऱ्या त्या आगंतुकांचा राग आला. ती खळ-बळ कशी निर्माण होते हे जाणून घेण्याचे कुतूहल त्याच्या मनामध्ये निर्माण झाले— आणि संतापही !

सोअर्डफिशने सागरामध्ये उफाळणाऱ्या बुडबुड्यांमधून ढूस मारली. अगदी वेगाने, सर्व ताकद एकवटून !

श्वेतप्रभेने एक आर्त किंकाळी मारली. तिच्या मनामधले प्रेमभाव-नेचे, शरीरामधले अत्यानंदाचे काहूर निमिषार्धात विरून गेले. राहिली ती एक भयानक, असह्य वेदना !

सोअर्डफिशच्या धडकीबरोबरच त्याच्या डोक्यासमोरची तलवार श्वेतप्रभेच्या कुशीत खोलवर घुसली. तीन मीटर लांबीचे ते पाते तिचे एक

फुप्फुस फाडून तिच्या हृदयामध्ये शिरले.

श्वेतप्रभेने वेदनेच्या आकांतात आपल्या शरीराला एकच हिसका दिला. त्या हिसक्याने सोअर्डफिशची तलवार मुळापासून तुटली. सोअर्ड फिशच्या मस्तकात वेदनांची आग उसळली. तो किंचाळत वळला. खोल पाण्याकडे धावला. दिसेनासा झाला.

श्वेतप्रभा अगदी निचेष्ट झाली. संग्रामला काय झाले होते ते समजलेच नाही. त्याने सोअर्डफिशला पाहिलेच नव्हते. संग्राम त्या क्षणी मीलनाच्या उत्कट आनंदाच्या अपेक्षेने आपल्यातच हरवून गेला होता.

आता त्याने श्वेतप्रभेभोवती फिरायला सुरवात केली. तो तिला आर्जवू लागला. मग लटक्या रागाने त्याने तिच्या कुशीत हलकीशी धडक मारली. त्या धडकीबरोबर श्वेतप्रभेच्या छातीमधून रक्ताची धार बाहेर पडली. ती परत एकदा किंचाळली. पण तिने काहीच हालचाल केली नाही.

संग्रामला समजले की काही तरी भयानक घडले होते. त्याच्या मेंदूमध्ये जुन्या आठवणींनी गर्दी केली त्याच्या पित्याचे–हिंमतचे– शरीर त्याच्या नजरेसमोर आले. ते चित्कार, ते रक्ताचे लोट, तो मृत्यूच्या आगमनाचा संदेश !

संग्राम भीतीने थरथरू लागला. त्याचे मन करुणेने भरून आले.

त्याने नुकतीच श्वेतप्रभेची जीवनसाथी म्हणून निवड केली होती. आणि लगेच हा भयंकर प्रसंग त्यांच्यावर ओढवला होता.

संग्रामने फर्रकन आपला एक पंख श्वेतप्रभेच्या मानेखाली घातला. तो तिला पोहण्यासाठी विनवू लागला. संग्रामला समजून चुकले की तिला उथळ पाण्यात घेऊन जाणे आवश्यक होते. पण उथळ पाणी कोठे आहे हेच त्याला माहीत नव्हते. त्याने ध्वनितरंग पाण्यात सोडले. त्यांच्या प्रतिध्वनींनी त्यांना सांगितले की दूरवर एक बर्फाचा कडा आहे.

आता श्वेतप्रभाही पहिल्याबहिल्या धक्क्यातून सावरली होती. तिच्या वेदनाही आता ओसरू लागल्या होत्या. तिची छाती बधीर झाली होती.

संग्रामने तिला हळूवारपणे आर्जवले. दिलासा दिला. तिने अगदी मंद गतीने संग्रामच्या आधाराने त्या हिमकड्याकडे पोहायला सुरवात केली.

पण पाच दहा मिनिटांतच त्यांची वाटचाल थांबली. श्वेतप्रभा परत निचेष्ट झाली. तिने उच्छवास सोडला. तिच्या मस्तकामधून रक्त आणि पाणी हवेत उफाळले. तिच्या फाटलेल्या फुप्फुसामध्ये रक्तस्राव होत होता. हृदयामध्ये पडलेल्या भोकामुळे तिच्या मेंदूला रक्त पोहोचत नव्हते.

संग्रामच्या लाडक्या श्वेतप्रभेची अखेर जवळ आली होती !

संग्रामने परत परत तिला आर्जवायला सुरवात केली. श्वेतप्रभेने स्वतःला पाण्यावर ठेवण्याचा अखेरचा प्रयत्न केला. तिच्या मंद होत चाललेल्या दृष्टीने संग्रामला शेवटचे डोळे भरुन पाहिले. आणि मग तिच्या डोळयांतले उरले सुरले तेजही नष्ट झाले. तिने शेवटचा उच्छवास सोडला. लालभडक रक्त पाण्यावर उसळले. संग्राम त्या रक्तांत न्हाऊन निघाला.

आणि मग श्वेतप्रभा सागरावर उपडी झाली. तिचे जड, निष्प्राण शरीर पाण्याखाली जाऊ लागले. संग्रामने तिच्या बरोबर पाण्यात डुबका मारली. त्याने ओळखले की त्याचे पहिले प्रेम आता कायमचे सपले होते.

श्वेतप्रभेचे शरीर सागराच्या तळाकडे जाऊ लागले. संग्रामने खूप खोलवर श्वेतप्रभेला साथ दिली. मग तो थांबला. त्याच्या डोळयांसमोर तिचे शरीर हळुहळू खोलवर गेले. रक्ताळलेल्या पाण्यातून संग्राम ते पाहात राहिला.

शेवटी श्वेतप्रभेचे शरीर दिसेनासे झाले. राहिला तो पाण्यात पसरलेल्या तिच्या रक्ताचा दर्प !

:

संग्राम खिन्न मनाने सागराच्या पृष्ठभागाकडे वळला. पाण्यावर आला. त्याने एक आर्त साद घातली.

मी एकटा आहे ! अगदी एकटा !

---

श्वेतप्रभेचा सागरसंग्राम संपला होता. संग्रामचा सागरसंग्राम परत सुरू झाला होता.

त्याने परत उत्तर ध्रुवाकडे पोहायला सुरुवात केली.

# ॥ आठ ॥

सागरावर मध्यरात्रीचा सूर्य तळपत होता. त्याच्या प्रकाशामध्ये आकाश तांबडेलाल दिसत होते.

संग्राम आता उत्तर ध्रुवाच्या सान्निध्यात पोहोचला होता. तरंगत्या बर्फाच्या लगद्यांनी बनलेले पृथ्वीचे छप्परच ते ! तिथेच विशालची त्याच्या कुटुंबापासून कायमची फारकत झाली होती. त्या ओसाड, बर्फाळ वाळ-वंटाच्या किनाऱ्यावर मृत्यूने आपले जाळे पसरले होते.

स्कॉटलंडचा ऊबदार, खाद्याने रेलचेल किनारा आता दूर राहिला होता. एका सादीने संग्रामला त्या शुभ्रधवल जमिनीकडे खेचले होते. पण ती साद आता कुठेच ऐकू येत नव्हती. संग्राम ती साद परत ऐकू येण्याची वाट पाहू लागला. आसमंतातून येणारे चित्रविचित्र आवाज एकाग्र चित्ताने ऐकू लागला.

संग्रामला एकटेपणा भासत होता. पण तो खरोखरीच एकटा नव्हता. त्याच्यासारखेच हजारो प्राणी, पक्षी आणि मासे उन्हाळ्यासाठी त्या भागात आले होते. तिथे भरपूर खाद्य मिळते म्हणून !

तिथे सागरामध्ये सगळीकडे जलवनस्पतींचे भरघोस जंगल पसरले होते. त्या जंगलात क्रिल माशांचे थवे हुंदडत होते.

क्रिल मासे आणि जलवनस्पती खाणाऱ्या प्रचंड निळ्या देवमाशांची तिथे गर्दी दिसे. खाद्याच्या अपेक्षेने आलेले हंपबॅक, स्पर्म आणि सी इत्यादि

जातीचे देवमासे सागरात वावरताना दिसत. दक्षिणेकडून आलेल्या पक्ष्यांचे थवे आकाशात फडफडत. अधूनमधून एखादे पांढरेशुभ्र अस्वल बर्फावर फतफत पंजे आपटत हिंडताना दिसे. कुठेकुठे त्या अस्वलांची कुटुंबे बर्फामधल्या फटींमध्ये माशाची शिकार करताना आढळत. कान आणि फर असलेले उत्तरेकडचे सील बर्फावर सर्वत्र विखुरलेले दिसत. त्यांची शरीरे ते विश्रांतीसाठी बर्फाळ किनाऱ्याच्या उतारावर पहुडले की सूर्यप्रकाशात चकमकत. मधूनच एखादा वॉलरस हा मिशाळ, सुळे आणि सीलसारखेच पंख असणारा सस्तन प्राणी दिसे. तो मिचमिच्या डोळ्यांनी सागराला निरखू लागे— अगदी चष्मा काढलेल्या आजोबासारखा !

मृत्यूनेही तिथे थैमान घातले होते !

सगळेच जीव एक दुसऱ्याला खाऊन जगणारे. माणूसही त्यामध्ये मागे नव्हता सागराच्या त्या भागात देवमाशांची शिकार करणारी अनेक जहाजे फिरत होती. त्यांच्या इंजिनांचा घरघराट एकसारखा ऐकू येई. दिवसातून कित्येकदा त्या जहाजांवरच्या बंदुकींचे आवाज हवेत उमटत. उत्तर ध्रुवावरच्या स्वच्छ वातावरणातून त्याचे पडसाद दूरवर पोहोचत. मागोमाग येत देवमाशांच्या किंकाळ्या! त्यांची जगण्यासाठी होणारी भयंकर फडफड!

उत्तर ध्रुवाजवळचा आर्क्टिक महासागराचा तो भाग चित्रविचित्र आवाजांनी गजबजलेला होता.

प्रचंड हिमकडे झगमगत्या सूर्याखाली वितळत, तडकत, फुटत, कोसळत. त्यांनी बनलेले झळझळते हिमप्रवाह सागराच्या पाण्यामध्ये बर्फाच्या लाखो तुकड्यांनी आदळत सागराच्या पाण्याचे अगणित मोठाले चमचमते तुषार वातावरणात उधळत आणि परत पाण्यात कोसळत. लाखो टन वजनाचे बर्फाचे तुकडे गडगडत येऊन सागराच्या पाण्यात आदळत. पाण्याचे प्रचंड फवारे हवेमध्ये उफाळत, घुसळत, फसफसत. मग ते परत नव्याने बनलेल्या हिमपर्वतावर येऊन आपटत, फेसाळत. सागराच्या पाण्यात मिसळून जात

संग्रामने बर्फाच्या त्या लगद्याखाली डुबकी मारली. तिथल्या निळ्या-शार पाण्यात त्याला बर्फामधल्या असंख्य वाटा दिसू लागल्या. त्याने तिथे शिकार करायला सुरवात केली.

तो पांढऱ्याशुभ्र बर्फाळ छताखाली अगदी सावधपणे फिरू लागला. तिथल्या नागमोडी गुहांमध्ये लपू लागला. तिथे एकाग्र होऊन ऐकू लागला— सागराच्या पृष्ठभागावर येणाऱ्या क्रिल माशांवर झडप घालणाऱ्या पक्ष्यांच्या पंखांची फडफड! खोल पाण्यामध्ये फिरणाऱ्या कॉड माशांच्या थव्यांची सळसळ ! सागराच्या किनाऱ्यावरती फेसाळणाऱ्या लाटांमध्ये खेळणाऱ्या सीलच्या आरोळ्या !

तो ध्वनितरंग पाण्यामध्ये सोडू लागला. त्यांचे परतणारे प्रतिध्वनी ऐकू लागला. त्यांचे विश्लेषण करू लागला. श्वापदाची जागा, गती आणि दिशा ठरवू लागला. आपले बलाढ्य शेपूटपंख हलवत हळुवारपणे श्वापदा-कडे सरकू लागला— बर्फाच्या आडोशाने ! आणि मग एकदम तुफान वेगाने श्वापदावर झडप घालू लागला— श्वापदाला निसटण्याची इवलीशीही संधी न देता !

सागर किनाऱ्यावरच्या बर्फावर वावरणारे प्राणीसुद्धा कधीही सुर-क्षित नसत.

संग्राम सागराच्या किनाऱ्यावरच्या पाण्याखाली पोहू लागला. साग-राच्या किनाऱ्यावरील बर्फ निरखू लागला— पांढऱ्या पार्श्वभूमीवरचा एखादा वेगळ्या रंगाचा पुसट चट्टा ! बर्फावर पडलेल्या सावटामधला एखादा गर्द ठिपका! उन्हामध्ये लवंडलेल्या एखाद्या दुर्दैवी जीवाची थोडीशी हालचाल!

तो विद्युत्वेगाने पाण्यावर उसळी मारू लागला. काय होते आहे हे कळण्याआधीच त्या हबकलेल्या श्वापदाला जबड्यात चिरडून टाकू लागला. तितक्याच वेगाने परत पाण्याखाली अदृश्य होऊ लागला.

त्या उन्हाळ्यामध्ये संग्रामचे भरपूर पोषण झाले. तो आकाराने भरभर

वाढू लागला. त्याची लांबी आता नऊ मीटर झाली. त्याचे शरीर बलाढ्य, वेगवान आणि मृत्यूचे प्रतीक बनले. त्याचे पंख मोठाले आणि गोल झाले. त्याचे शेपूटपंख रुंद आणि वक्र झाले. त्याच्या पाठीवरचा पंख ताठ झाला – दोन मीटर उंच आणि शक्तिमान !

त्याचे शरीर व्रणांनी भरून गेले. काही व्रण लांबलचक आणि चिचोळे अणकुचीदार बर्फाचे तुकडे आणि खडकांमुळे झालेले ! तर काही व्रण करडे आणि आडवे तिडवे–त्याच्या उत्तरेकडच्या जलप्रवासामध्ये झालेल्या स्क्विड, काँगरईल आणि खुंट्यांसारखे सुळे असलेल्या स्पर्म जातीच्या देवमाशां-बरोबर झालेल्या लढायांमध्ये मिळवलेले !

उत्तर ध्रुवावरचा उन्हाळा अजून संपला नव्हता. संग्राम अजूनही एकटाच होता. त्याने दूरवर सादी घालायला सुरवात केली. त्याच्या सादींना प्रत्युत्तर मिळाले– त्याच्या सारख्याच एकट्या असलेल्या देवमाशांचे ! पण ते सगळे देवमासे इतर जातींचे होते. एकही शिकारी देवमाशाने त्याला प्रति-साद दिला नाही. त्याच्या सादी सागराच्या प्रत्येक कोपऱ्यामधून त्याच्याच-कडे परत आल्या. सागर जणू त्याची जीवघेणी थट्टा करत होता.

दिवसेंदिवस संग्रामला तो एकटेपणा असह्य वाटू लागला.

आता सूर्य क्षितिजा पलिकडे जास्त काळ राहू लागला. दिवस हळूहळू छोटे होऊ लागले. रात्री वाढू लागल्या. त्या अफाट, बर्फाळ प्रदेशावर हिम-बादळांनी थैमान घालायला सुरवात केली. पक्ष्यांचे थवेच्या थवे गडबडीने दक्षिणेकडे जाऊ लागले. उत्तर ध्रुवाकडची पांढरी अस्वले परतू लागली. सील आपल्या पिलांना घेऊन दक्षिणेकडे परतू लागले. सागर उफाळू लागला. बर्फाचे प्रचंड तरंगते, वाहते तुकडे वर खाली होऊ लागले. धडधडू लागले.

हिवाळ्याने आपल्या पंजांनी उत्तर ध्रुवावर ओरखडे काढायला सुर-वात केली.

संग्रामने हिवाळ्याच्या आगमनाच्या खुणांकडे दुर्लक्ष केले. त्याला सागरसंग्रामाविषयी अजून बरेचसे शिकायचे होते.

एका संध्याकाळी तो पाण्यावरच्या एका हिम पर्वतावर पहुडला होता. त्याचे मस्तक पाण्याबाहेर होते. त्याच्या डोक्यावर बर्फाचा एक प्रचंड निळसर कडा लोंबत होता.

उन्हाळ्याच्या सूर्यामुळे त्या कड्याला आधार देणारे खांब वितळून गेले होते.

एकाएकी संग्रामला बर्फ तडकण्याचा भयंकर कर्कश आवाज ऐकू आला. त्याच्या शरीरामध्ये भीतीची शिरशिरी उठली. तो झटदिशी वळला आणि एका कुशीवर झाला. त्याने वरती पाहिले. डोक्यावरचा बर्फाचा कडा कोसळत होता.

ते कोसळणारे बर्फ संग्रामच्या कुशीयर आदळले. त्या धक्क्याने आणि दाबाने त्याच्या बरगड्या मोडल्या. त्याच्या डोळ्यांना अंधारी आली. पण त्या बर्फाने संग्रामला पाण्याखाली दबवले नाही. तसे झाले असते तर तो पाण्यात वुडालाच असता. त्याच्या आसपास इतके बर्फ कोसळले की त्यामुळे सागराचे पाणी उफाळले. संग्राम पाण्याबाहेर फेकला गेला. हिमपर्वताच्या उतरणीवर आपटला.

संग्राम तिथे आपल्या चांगल्या कुशीवर अगदी गप्प पडून राहिला. त्याच्या मस्तकावर एक मोठाली किळसवाणी जखम झाली होती. तिच्यातून वाहणाऱ्या रक्तामध्ये त्याची कूस भिजून गेली. थंडीमुळे कातडी निळसर, करडी होऊ लागली. आकसू लागली. त्याची छाती थरथरू लागली. त्याचा श्वासोच्छवास सरळ होईना. त्याच्या घशात घरघर सुरू झाली. त्याच्या अंगाखालच्या बर्फाने त्याची शक्ती शोषून घ्यायला सुरवात केली. तीव्र वेदनांची नखे त्याच्या शरीरात घुसली. त्याची शुद्ध हरपली. वेदनांची तीव्रता वाढली की तो तेवढ्यापुरता शुद्धीवर येऊ लागला.

थोड्यावेळाने तो हिमपर्वत थोडासा हलला. संग्राम निसरून पाण्यात पडला. जगण्याच्या दुर्दम्य इच्छेने त्याच्या अर्धवट शुद्धीवर असलेल्या मेंदूची पकड घेतली. त्याच्या पंखांनी त्याचे शरीर सरळ ठेवले. वेदनांनी त्याला शुद्धीवर आणले. त्याने जोराने हाक मारण्याचा प्रयत्न केला. पण त्याच्या कंठातून मुसमुसणे आणि हुंदके याशिवाय दुसरे कोणतेच आवाज बाहेर पडले

नाहीत. त्याचे डोके पाण्याखाली जाऊ लागले. मग मात्र तो एकदम किंचाळला.

जवळपासच्या पाण्यामधे फिरणाऱ्या स्पर्म जातीच्या एका प्रचंड देवमाशाने ती किंकाळी ऐकली. त्या किंकाळीमधली भयंकर भीती त्याने ओळखली. आसपासच्या प्रदेशातले सील पळून गेले. कारण शिकारी देवमाशाचा आवाज त्यांना परिचित होता.

हळू, अगदी हळू संग्रामने त्याचे प्रचंड शेपूटपंख हलवले. त्याचे शरीर थोडेसे पुढे सरकले. तो वेदनांचा प्रतिकार करत मंद गतीने कसाबसा एका निळसर हिमपर्वताजवळ आला. तिथे बर्फाचा एक मोठाला तुकडा बाहेर दिसत होता. संग्रामच्या जबड्याने त्या तुकड्याचा चावा घेतला. त्याचे सुळे बर्फात रुतले. आता त्याचे डोके पाण्याबाहेर राहिले.

पण त्याची शक्ति पूर्णतः संपली होती. सागराची एक लाट त्याच्या पाठीवर येऊन आदळली. त्याच्या मस्तकामधली श्वासोच्छ्वास करण्याची भोके पाण्याने भरून गेली. तो जबडा मिटवूनच खोकू लागला. ठसठसू लागला. त्याची छाती वेदनांनी भाजून निघाली. तो परत एकदा किंचाळला. पण त्याने आपल्या जबड्याची बर्फावरली पकड सैल केली नाही. त्याचा श्वासोच्छ्वास चालूच राहिला.

दक्षिणेला कित्येक किलोमीटर अंतरावर बर्फाचे लगदे संपत आले होते. तिथल्या पाण्यात दहाबारा शिकारी देवमाशांचा एक कळप पोहत होता. सहा महिन्यांपूर्वी त्या कळपाचा अनुभवी म्होरक्या मृत्यूमुखी पडला होता. आता कळपाचे नेतृत्व एका तरुण शिकाऱ्याकडे आले होते. पण तो अजूनही अननुभवी होता. कळपामधल्या इतर देवमाशांना त्याचा विश्वास वाटत नसे. त्याचे दुर्बल आदेश ते कित्येकदा धुडकावून लावत.

त्या कळपामध्ये एक देखणी तरुण मादी होती. तिने नुकताच यौवनात प्रवेश केला होता. तिची लांबी सहा मीटर होती. तिच्या रुंद पाठीवर सुंदर पांढरे ठिपके होते. तिला आर्क्टिक महासागराचा तो भाग आवडत नसे.

तिचे घर होते नॉर्वे आणि फेरोज मधल्या सागरात. तिथल्या अटलांटिक महासागराच्या खोल शांत परिसरात जाण्यासाठी तिचे मन आसुसले होते. ती नेहमी कळपाच्या अगदी मागे मागे पोहत असे.

तिचे नांव होते मत्स्यरूपा !

मत्स्यरूपा पृष्ठभागाखाली डुबकी मारत होती. तिथे पोहणाऱ्या माशांच्या एका थव्यावर झडप घालण्यासाठी. एकाएकी तिला उत्तरेकडून एका तरुण शिकाऱ्याची आर्त किंकाळी ऐकू आली.

ती किंकाळी संग्रामची होती.

मत्स्यरूपा एकदम थांबली. ती किंकाळी तिने ओळखली. तो तरुण शिकारी कसल्या तरी भयानक संकटात सापडला आहे हे तिने ताडले- त्याला मदतीची गरज आहे हे तिने ओळखले.

तिने त्या किंकाळीला प्रतिसाद दिला. तिने संग्रामला ओरडून सांगितले. मी तुझ्या मदतीला येते आहे ! घाबरू नकोस ! त्या पांढऱ्याशुभ्र बर्फाळ वाळवंटातून तिचा प्रतिसाद संग्रामपर्यंत पोहोचला. पण अर्धवट शुद्धीत असलेल्या संग्रामने तो ऐकला नाही.

मत्स्यरूपा भरभर सागराच्या पृष्ठभागावर आली. तिने लांबलचक श्वास घेतले. आता ती संग्रामच्या मदतीसाठी सज्ज झाली. तिच्या भव्य शरीराने पाण्याखाली डुबकी मारली. बर्फाच्या लगद्याखालून ती संग्रामच्या दिशेने पोहू लागली. सगळी शक्ती पणाला लावून ! तिने परत एकदा संग्रामला साद घातली. मग आपली गती वाढवली.

संग्रामला तिची दुसरी हाकही ऐकू आली नव्हती. आता फक्त त्याचा जबडा काम करत होता. बर्फावरची त्याची पकड सैल झाली नव्हती. पण त्याचे शरीर अगदी निर्जीवपणे लोंबकळत होते. त्याची श्वासोच्छवास घेण्याची भोके अजूनही पाण्याबाहेर होती. तो मदतीसाठी मुसमुसत होता.

मग एकाएकी त्याच्या जबड्यातला बर्फाचा तुकडाही तुटला. संग्राम पाण्यात कोसळला. तो सरळ सागराच्या तळाकडे जाऊ लागला. त्याच्या मस्तकावरील भोकांतून चंदेरी बुडबुडे उठले. त्या बुडबुड्यांबरोबरच त्याचा

शेवटचा चित्कार बाहेर पडला. मदतीसाठी ! निराशेचा ! हृदयाला भेदून जाणारा !

मत्स्यरूपाने तो चित्कार ऐकला. ती घाबरली. वेडीपिसी झाली. तिने आपले शेपूटपंख झटकले. बाजूपंख हलवले. सागराच्या तळाकडे डुबकी मारली. जीवाच्या आकांताने ती संग्रामच्या चित्काराच्या दिशेने फरफरू लागली. खोल, खोल अगदी खोल पाण्याकडे !

ती थांबली. मग वळली. तिने ध्वनितरंग बाहेर सोडले. त्यांच्या प्रतिध्वनींचा वेध घेतला मग तिने वरती बघितले. संग्रामचे प्रचंड शरीर तिला दिसले. हळूहळू खोल पाण्याकडे येणारे ! तिने संग्रामचे लांबलचक शरीर, त्याच्या देखण्या पाठीवरचे काळे पांढरे ठिपके एकदा डोळे भरून बघितले. मग ती संग्रामच्या दिशेने उफाळली.

तिने आपली पाठ संग्रामच्या पोटाखाली घातली. त्याचे अफाट ओझे तिला जाणवले. मग तिने हळुवारपणे संग्रामला सागराच्या पृष्ठभागाकडे उचलले.

ते दोघेही आता सागराच्या पृष्ठभागावर आले. संग्राम थोडासा खोकला. त्याच्या फुप्फुसांतले पाणी बाहेर पडले. त्याने एक दीर्घ श्वास घेतला. मग तो निपचित पडून राहिला. मत्स्यरूपेच्या आधाराने !

ते दोघेही खूप वेळ तसेच स्तब्ध राहिले. मग मत्स्यरूपा त्याला बोलावू लागली. आळवू लागली. ती म्हणत होती, तू आता एकटा नाहीस! मी आहे ना तुझ्या मदतीला !

पण संग्राम शुद्धीवर होताच कोठे ? मत्स्यरूपेचे शब्द त्याला आकळले नाहीत. तो गप्पगार पडून राहिला.

पण संग्राम आता खरोखरीच एकटा नव्हता. निसर्गाने त्याला एक सोबती पाठवला होता. सागरसंग्रामामध्ये मदतीसाठी !

सूर्य आता मावळला होता. सागरावर, बर्फावर सगळीकडे अंधार पसरू लागला होता.

मत्स्यरूपा अजूनही संग्रामला बोलवतच होती !



# ॥ नऊ ॥

संग्राम आणि मत्स्यरूपा बराच वेळ सागराच्या पृष्ठभागावर पडून राहिले. प्रचंड हिमपर्वताच्या राशीमधले दोन छोटेसे जीव कसेबसे जिवंत राहण्याच्या आशेने धडपडणारे !

मत्स्यरूपा संग्रामशी बोलतच होती. हळूवारपणे ! आर्जवाने ! शेवटी एकदाचे तिचे शब्द संग्रामच्या कानांवर पडले. त्याचा बधीर झालेला मेंदू चाळवला गेला.

आणखीन एक दिवस उलटला. मत्स्यरुपा संग्रामशी बोलतच होती. मग संग्रामला त्याच्या अवतीभोवतीची जाणीव होऊ लागली. तो विव्हळू लागला. कण्हू लागला. त्याला मत्स्यरूपा आता आपल्या मदतीला आहे हे उमगले. त्याने आपला एक प्रचंड पंख तिच्या शरीरावर टाकला.

त्याच्या बेशुद्धीची जागा आता गाढ झोपेने घेतली. पण त्याला भयानक स्वप्ने पडू लागली. तो किंचाळत जागा होऊ लागला. त्याचे शरीर थरथरू लागले. त्याच्या छातीमधल्या भयंकर वेदनांनी त्याच्या शरीराचा ताबा घ्यायला सुरवात केली.

कित्येक दिवस ते तसेच पडून राहिले. सागराच्या पृष्ठभागावर ! एकाच जागी ! मग संग्रामला पूर्ण शुद्ध आली. त्याचे निस्तेज डोळे उघडले. त्यांच्यामधली निर्जीवपणाची झाक हळूहळू कमी झाली.

मत्स्यरूपाने संग्रामच्या पोटाखालून आपली पाठ काढली.

संग्रामने पाहिले –तिची रुंद, गुळगुळीत पाठ ! तिचे चमकते मिश्किल डोळे !

मग मत्स्यरूपेने परत त्याला आपल्या पाठीवर घेतले. त्याला सागराच्या पृष्ठभागावर ठेवले. संग्रामने दीर्घ श्वास घेतला. हळूहळू त्याच्या शरीरातली ऊब परतू लागली. तो शांतपणे झोपी गेला. अधूनमधून त्याच्या कुशीमधली जखम एकदम दुखू लागली. तो खडबडून जागा होऊ लागला. मग मत्स्यरूपा त्याला परत झोपवू लागली.

संग्राम आणि मत्स्यरूपा यांना आता हिवाळ्याचा कडाका जाणवू लागला. त्यांच्या अवतीभोवतीचे पाणी गोठू लागले. मत्स्यरूपाला नॉर्वेचा किनारा आठवला. तिथल्या शिशिर ऋतूच्या मुलायम प्रकाशाचे किरण तिच्या मनाच्या स्वप्नभूमीवर पडले. ती सुखावली.

मत्स्यरूपेने जाणले की त्यांना आता तिथून निघायला हवे होते. सागराचा तो विसरलेला कोनाडा गोठून मृत्यूचा सापळा बनण्यापूर्वी !

तिने संग्रामला पुढे ढकलेले. पण तो फारच अशक्त झाला होता. भरभर गोठणाऱ्या पाण्यामधून पुढे सरकणे त्याला जमेनासे झाले. तो दमू लागला. तो वारंवार थांबू लागला. मत्स्यरूपाच्या शरीरावर एक पंख टाकून विश्रांती घेऊ लागला. श्वासोच्छ्वास करू लागला. थोड्या वेळाने वेदना सहन करत पुढे सरकण्याचा प्रयत्न करू लागला.

मग मत्स्यरूपा पुढे सरसावली. तिने मस्तकाने धडकी देऊन बर्फ फोडायला सुरवात केली. तिचे प्रचंड शरीर हवेत उफाळू लागले. मग परत सागरावर पसरलेल्या बर्फावर आपटू लागले. त्या दणक्यांनी बर्फ फुटू लागले. बर्फामधून रस्ता मिळू लागला.

मत्स्यरूपेची शक्ती बर्फाच्या रक्त गोठवणाऱ्या थंडीने शोषून घेतली. तिचे शरीर काळसर पडले. तिच्या शरीरावर जखमा झाल्या. मोठाले ओरखडे पडले. तिचे भुकावलेले पोट आक्रोश करू लागले. संग्राम आंधळ्या

सारखा तिने दाखविलेल्या मार्गाने पुढे सरकू लागला.

पण अखेर मत्स्यरूपाने संग्रामला बर्फाच्या त्या ओसाड वाळवंटातून बाहेर काढले.

आता त्यांच्या आणि नार्वेच्या किनाऱ्यामध्ये फक्त खुला सागर होता.

हळू हळू संग्रामही बरा झाला. त्यांच्या बरगड्यांची हाडे परत चांगली झाली. त्याच्या शरीरामधला अंतर्गत रक्तस्राव थांबला. त्याच्या कुशीमधली जखम भरली. तिच्यावर खपली धरली.

पण त्याच्या मनावर झालेल्या जखमा बऱ्या व्हायला मात्र खूप वेळ लागला जवळजवळ महिनाभर तो फक्त मत्स्यरूपाने दिलेल्या आदेशांचे पालन करी. तिने दाखविलेल्या दिशेने पोहत राही. तेही अशक्तपणे नाहीतर झोपूनच राही.

आता त्यांचा जलप्रवास सुरू होऊन दोन महिने उलटले. त्यांनी आर्क्टिक महासागर मागे टाकला. नॉर्वेच्या किनाऱ्यावरच्या खोल, संथ खाड्यांमधे प्रवेश केला.

संग्राम आता पूर्णत: बरा झाला होता.

त्यांनी दिवसभर शिकार करायला सुरवात केली. तिथल्या विपुल भक्ष्यांवर मेजवानी सुरू केली. आणि संध्याकाळ झाल्यावर ते सागराच्या पृष्ठभागावर खेळू लागले. खाड्यांच्या संथ पाण्यावर चंदेरी, धनुष्याकृती लाटा धावू लागल्या. ते पाण्यावर उफाळू लागले. परत पाण्यात आपटू लागले. मत्स्यरूपा पुढे पुढे पोहू लागली. संग्राम तिच्या मागे झरझरू लागला. तिचे चावे घेऊ लागला.

ती मध्यरात्रीची वेळ होती. चंद्र डोक्यावर आला होता. आकाशात तारका चमचमत होत्या. सगळा सागर त्या चंदेरी प्रकाशात न्हाऊन निघाला होता.

संग्राम आणि मत्स्यरूपेची शरीरे पाण्याबाहेर उसळली. त्यांनी एकमेकांना विळखे घातले. त्यांचे पंख, पोटे आणि शेपट्या एकत्रित आल्या.

त्यांचे प्रथम मीलन झाले. त्यांची मने आणि शरीरे एकत्रित आली. जन्माच्या सोबतीसाठी !

वसंतऋतूच्या चाहुलीने जमीन जागी झाली. सागरही चाळवला. हिमनद्या गडगडू लागल्या. त्यांना तडे जाऊ लागले. दूर पर्वतावर साठलेले बर्फ कोसळू लागले. हिमपर्वताचे आवाज वातावरणात दुमदुमू लागले. नद्यांचे पाणी वितळलेल्या बर्फामुळे पांढरेशुभ्र झाले. नद्यांना पूर आले. त्यांचे फेसाळते प्रवाह सागराच्या खाड्यांमध्ये मिसळू लागले. झाडाझुडपांनी बर्फाचे बुरखे भिरकावून दिले.

सॅलमन माशांचे थवेच्या थवे सागर किनाऱ्याकडे धावू लागले. त्यांच्या मागोमाग सीलचे कळप येऊ लागले.

संग्राम आणि मत्स्यरूपेने त्यांना येताना ऐकले. मग आपल्या शिकारीला सुरवात केली मत्स्यरूपेची भूक आता अतिशय वाढली होती. तिच्या पोटामध्ये आता बाळ होते ना ! त्याचेही पोषण करण्यासाठी तिला अधिक अन्नाची गरज होतीच की !

दिवस लांब होऊ लागले. रात्री छोट्या झाल्या. खाड्यांवर सगळीकडे गजबजाट सुरू झाला. जहाजांच्या इंजिनांची घरघर वातावरणात घुमू लागली. जहाजांच्या पंख्यांचे गीत सागरलहरींवर खेळू लागले. मच्छीमाराने पाण्यात फेकतांना होणारे जाळ्यांचे आवाज सर्वत्र ऐकू येऊ लागले.

संग्राम आणि मत्स्यरूपेने खाड्यांचा परिसर सोडला. तिथले चित्रविचित्र आवाज मागे टाकले. उन्हाळ्याच्या झगमगत्या सूर्यप्रकाशामध्ये त्यांनी खोल सागराकडे जायला सुरवात केली.

उत्तर ध्रुवाजवळचे बर्फ आणि नॉर्वेच्या खाड्यांनी त्यांना नवजीवन दिले होते. आता संग्राम मत्स्यरूपेला घेऊन पश्चिमेला जाऊ लागला. तिथल्या पाण्यातच त्याने आपल्या बालपणाचे मजेदार दिवस घालवले होते.

एका रात्री आकाश अगदी निरभ्र होते. वर चंद्र लखलखत होता. त्याचे प्रतिबिंब लाटांशी लपंडाव खेळत होते. सागरावरचे वातावरण अगदी स्वच्छ होते. धुक्याचे नामोनिशानही दिसत नव्हते.

मत्स्यरूपेनें एकदम संग्रामला साद घातली. तिचे अवघडलेले शरीर लाटांवर विसावले. गर्भामुळे फुगलेले तिचे पोट थरथरू लागले. तिने आपले शरीर धनुष्याकृती केले. मग एकदा, दोनदा, तीनदा शरीराला झटके दिले. तिच्या शरीरातून एक छोटीशी शेपटी बाहेर आली. मत्स्यरूपेने परत एकदा आपल्या शरीराला झटका दिला. आणि देवमाशाच्या एका बछडयाचा जन्म झाला. त्या बछडयाच्या शरीरावर मत्स्यरूपेप्रमाणेच मोठाले, सुंदर पांढरे ठिपके होते.

हीच नीलगंधा !

अटलांटिक महासागरावरची हवा थंडगार होती. मत्स्यरूपाने नील-गंधेला नाकाने सागराच्या पृष्ठभागावर ढकलले. नीलगंधेने पहिला-वहिला श्वास घेतला. फुप्फुसात शिरलेल्या थंड हवेमुळे तिचे शरीर थरथरू लागले.

मग मत्स्यरूपा पाण्यावर उपडी झाली. तिचे पांढरेशुभ्र पोट पाण्यावर आले. नीलगंधेने आपल्या नाकाने तिच्या ओटीपोटाला स्पर्श केला. क्षण-भरातच लिटरच्या लिटर गरम दुधाने नीलगंधेचे आतुरलेले तोंड भरून गेले.

संग्राम ते सगळे दृश्य अवाक् होऊन पहात होता. तो अनुभव त्याला नवखा होता. तो भांबावून गेला. तो मत्स्यरूपेच्या पंखांच्या आड लपलेल्या इवल्याशा नीलगंधेकडे पाहातच राहिला.

मग तो पुढे सरसावला. त्याने नीलगंधेला आपल्या नाकाने गुदगुल्या केल्या. ती क्षणभर गोंधळली. आता मत्स्यरूपा पाण्यावर सरळ आली होती. तिने नीलगंधेला नाकाने पुढे ढकलले. नीलगंधा पाण्यावर सळसळू लागली. मत्स्यरूपेच्या प्रत्येक हालचालीचे अनुकरण करू लागली. तिच्या छोटयाशा मस्तकातून पाण्याचे फवारे हवेत उडू लागले.

संग्राम धीमेपणे त्यांच्या भवतीभवती पोहू लागला.

नीलगंधेचा सागरसंग्राम सुरू झाला.

हिवाळा परत तोंडाशी आला.

आता संग्राम आपल्या छोटेखानी कुटुंबाला घेऊन दूर दक्षिणेला पोहचला होता. अॅझोरेसच्या सूर्याच्या उन्हाने ऊबदार झालेल्या पाण्यामध्ये !

संग्राम आणि मत्स्यरूपा तिथे रात्रंदिवस शिकार करू लागले. सागराच्या तळावर पसरलेल्या जहाजांच्या सांगाड्यामध्ये आणि खडकांमध्ये! नीलगंधा सागराच्या पृष्ठभागावर बागडू लागली.

अधूनमधून नीलगंधाही सागराच्या तळावर धावणाऱ्या निरुपद्रवी माशांचा पाठलाग करू लागली. शिकारीसाठी नाही, फक्त गंमतीचा खेळ म्हणून ! तिचे पोषण अजूनही मत्स्यरूपेच्या दुधावरच होत होते.

संग्राम आणि त्याच्या कुटुंबाचा वेळ अगदी मजेत चालला होता.

पण त्या भागामध्ये आणखी एक क्रूर आणि शक्तिमान शिकारी वावरत होता.

त्याचे नाव होते मानव !

त्या वर्षी अॅझोरेसच्या आकाशामध्ये एक नवीनच पक्षी आला होता. तो पक्षी मानवाने बनवला होता. देवमाशांच्या शिकारीमध्ये मदत व्हावी म्हणून.

त्या पक्षाचे नाव होते हेलिकॉप्टर !

एका सोनेरी सायंकाळी संग्राम, मत्स्यरूपा आणि नीलगंधा सागराच्या ऊबदार लाटांवर लोळत होते. अचानक संग्रामला आकाशातून कसल्यातरी वेगळ्याच आवाजाची जाणीव झाली. आकाशामध्ये एक हेलिकॉप्टर घिरट्या घालत होते.

हेलिकॉप्टरच्या पायलटने सागराच्या पृष्ठभागावर लोळणारे संग्रामचे कुटुंब टिपले. त्याने रेडिओ सेटवरून जवळपासच्या पाण्यात वावरणाऱ्या शिकारी जहाजाला संदेश दिला.

संग्रामला कसल्यातरी भयानक धोक्याची जाणीव झाली. त्याने मत्स्यरूपा आणि नीलगंधा यांना आपल्या मागोमाग येण्याचा आदेश दिला. त्याने पाठीमागे वळून मुसंड्या मारत पोहायला सुरवात केली. मध्येच तो प्रथम एका बाजूला वळून वेगाने पोहू लागला. मग तो दुसऱ्या बाजूला वळला, गोल गोल फिरू लागला. पाण्यामध्ये कधी वर तर कधी खाली जाऊ लागला. त्याने खोल पाण्यात डुबकी मारली मग जेव्हा श्वास घेणे अत्यावश्यक झाले तेव्हा पाण्यावर आला.

पण त्या हेलिकॉप्टरने त्यांचा पिच्छा सोडला नाही. हेलिकॉप्टरच्या इंजिनाचा आणि पंख्यांच्या आवाज संग्रामच्या कानांना एकसारखा छळू लागला.

मत्स्यरूपा आणि नीलगंधा संग्रामच्या आदेशानुसार त्याच्या मागोमागच पोहत होत्या. त्यांची बरीच दमछाक झाली होती.

संग्रामचे मन काळजीने भरून गेले.

शिकारी जहाजाच्या कॅप्टनला हेलिकॉप्टरच्या पायलटने पाठवलेला संदेश मिळाला. त्याने जहाज संग्रामच्या कुटुंबाच्या दिशेने वळवले.

ते अद्यावत जहाज होते. त्याला दोन पंखे होते. त्याच्यावर देवमाशांची शिकार करण्यासाठी उत्कृष्ट यंत्रे होती. ते वेगवान होते. एकदा किनारा सोडल्यानंतर पाचशे टन वजनाची देवमाशांची धुडे घेऊनच ते परते. शिवाय देवमाशांचे अस्तित्व टिपण्यासाठी मदतीला हेलिकॉप्टरही होतेच.

त्या जहाजाने उत्तर अटलांटिक महासागराची चाळणी केली होती. नॉर्वेच्या उत्तर किनाऱ्यावर अनेक देवमाशांची शिकार केली होती.

आता ते संग्रामच्या कुटुंबाच्या शिकारीसाठी निघाले होते. तो एक वेगळाच सागरसंग्राम होता.

एका बाजूला निसर्गाची शक्ती ! तर दुसऱ्या बाजूला मानवी कल्पकतेची !

सागराच्या पृष्ठभागावर ऊन चमकत होते. लाटा नृत्य करत होत्या.

जहाजावर दुर्बीण घेऊन खलाशी सागराची टेहळणी करत होते.

हेलिकॉप्टर एकाच जागी स्थिर झाले होते. तिथे एका खलाशाला संग्राम आणि मत्स्यरूपा यांचे प्रचंड आकार दिसले. दूरवरच्या एका बेटाच्या गडद पार्श्वभूमीवर ते अगदी स्पष्ट दिसत होते.

जहाजाने परत दिशा बदलली. हेलिकॉप्टरच्या पायलटला जहाजाच्या कॅप्टनने देवमासे पाहिल्याचे सांगितले. आपले काम संपताच हेलिकॉप्टर जमिनीकडे निघून गेले. कारण आता संध्याछाया सागरावर पसरू लागल्या होत्या.

जहाजाची गती वाढली. खलाशांनी जहाजाच्या डेकवर गर्दी केली. जहाजावर वेगवेगळी चाके, पुली फिरू लागल्या. नायलॉनचे दोर त्याच्यावरून सरसरू लागले. दोन खलाशी जहाजाच्या पुढच्या भागाकडे धावले. त्यांच्या हातामध्ये एक मोठाली बरची होती. शिकाऱ्यांची शिकार करणारे अस्त्र होते ते !

बंदुकीमागे उभ्या असलेल्या खलाशाने ती बरची बंदुकीमध्ये घातली. जहाजाच्या गतिमुळे होणारी वाऱ्याची फरफर त्याच्या कानांना जाणवली. तो अगदी उत्कंठेने संग्राम आणि मत्स्यरूपा यांना निरखू लागला. नील गंधेचा छोटासा आकार त्याच्या खिजगणतीतही नव्हता.

त्या खलाशाचा नेम अगदी अचूक होता. त्याने आजपर्यंत क्वचितच श्वापद हातातून हरवले होते. जहाजावरचे इतर खलाशी त्याच्याकडे अगदी आदराने पाहत.

बंदुकीमागे उभ्या असलेल्या त्या खलाशाला आदला दिवस आठवला.

त्या दिवशी जहाजावरच्या टेहळणी करणाऱ्या खलाशांनी दोन देवमासे टिपले होते. ती अगदी विचित्र जोडी होती. एक हंपबॅक तर दुसरा फिन जातीचा !

त्या दोन्ही देवमाशांचे कळप मारले गेले होते. शेवटी नाईलाजाने त्याना एक दुसऱ्याची सोबत धरावी लागली होती. पण ते शिकारी देवमासे नव्हते. त्यामुळे त्यांना एक दुसऱ्याची भीती नव्हती.

आता ते अटलांटिक महासागराच्या त्या भागात एकत्र पोहत होते.

तेही अँझोरसच्या पाण्यात आले होते. तिथल्या विपुल जलवनस्पतीवर मेजवानी उडविण्यासाठी !

जहाजाने त्या दोन्ही देवमाशांचा पाठलाग केला होता. देवमासे बंदुकीतल्या बरचीच्या टप्प्यात आले होते. आणि त्याच वेळी सगळी गडबड झाली होती.

एक ब्रिटिश जहाज तिथे आले होते. ते जहाज देवमाशाची कत्तल थांबवावी म्हणून चळवळ करणाऱ्या एका संस्थेचे होते. गंमतीची गोष्ट होती ! ब्रिटननेच पहिल्यांदा देवमाशांचे मास आणि चरबी यांच्यावर होणारे फायदे जगाला दाखवून दिले होते. मग इतर देशांनीही देवमाशांची शिकार करायला सुरुवात केली होती. इतक्या मोठ्या प्रमाणावर की ही जातच पृथ्वीतलावरून नष्ट होते की काय ही भीती सागरजीव शास्त्रज्ञांना वाटू लागली होती.

आणि आता ब्रिटननेच देवमाशांची कत्तल थांबावी म्हणून त्यांच्या शिकारीविरुद्ध मोहीम सुरू केली होती. देवमाशांचे अस्तित्व संपून जाऊ नये म्हणून. जगाच्या सद्सद्विवेकबुद्धीचे प्रतिनिधित्व त्या देशाने आपल्याकडे घेतले होते.

ब्रिटनच्या त्या रक्षक जहाजाने शिकारी जहाज पाहिले होते. देवमाशाचा झालेला पाठलाग पाहिला होता. मग त्या जहाजाने दोन रबराच्या होड्या बाहेर पाठवल्या होत्या. त्या होड्या शिकारी जहाज आणि देवमासे यांच्या मधोमध येऊन थांबल्या होत्या.

जवळ जवळ एक तासभर त्या होड्या. तिथेच होत्या. त्याच्या एका बाजूला दोन देवमासे तर दुसऱ्या बाजूला ते शिकारी जहाज ! आणि जवळ जवळ एक किलोमीटर अंतरावर उभे असलेले ते रक्षक जहाज.

बंदुकीमागे उभ्या असलेल्या खलाशाला हा अनुभव काही नवा नव्हता. त्याने त्या होड्यांना चुकवण्याचा प्रयत्न करून दोनदा बंदूक झाडली होती. पण दोन्ही वेळा त्याचा नेम हुकला होता.

शेवटी संध्याकाळ झाल्यामुळे शिकारी जहाजाला त्या देवमाशाचा नाद सोडून द्यावा लागला होता. किनाऱ्याची वाट धरावी लागली होती. मग

त्या होडयाही रक्षक जहाजाकडे परतल्या होत्या.

ते दोन्ही देवमासे आपल्या वाटेने निघून गेले होते. ते सुदैवी होते.

पण आजची गोष्ट वेगळी होती.

क्षितिजाबर रक्षक जहाजाची खूणही दिसत नव्हती. संध्याछाया सागरावर पसरू लागल्या होत्या. पण अंधार व्हायला अजूनही वेळ होता.

शिकारी जहाज आणि शिकारी देवमासे यांच्यामधला संग्राम अटळ होता. आणि त्या संग्रामाचा शेवट एकच होता.

संग्रामच्या सागरसंग्रामामधला तो सर्वात बिकट क्षण होता.

शिकारी जहाजाने आपली गती वाढवली. ते आता अगदी वेगाने संग्राम आणि त्याच्या कुटुंबाच्या दिशेने पाणी कापू लागले.

□

## ॥ दहा ॥

संग्रामने सागरतरंगांच्या आवाजाहूनही मोठ्याने होणारी शिकारी जहाजाच्या इंजिनाची घरघर ऐकली. त्याने जहाजांचे तसले आवाज पुष्कळदा ऐकले होते. त्या आवाजाहून तो नवा आवाज त्याला काही वेगळा वाटला नाही.

हेलिकॉप्टर आता निघून गेले होते. त्यामुळे त्याच्या मनातली भीती कमी झाली होती. पण तरीही त्याच्या मनात संशयाचे ढग दाटून आले होते का कोणास ठाऊक, त्या जहाजापासून आपण दूर गेले पाहिजे असे त्याला वाटू लागले.

पूर्वेला सागरामध्ये एक बेट दिसत होते. संग्रामने एक गर्जना केली. मत्स्यरूपा आणि नीलगंधा यांना आपल्या पाठोपाठ येण्याचा आदेश दिला. मग तिन्ही शिकाऱ्यांच्या मस्तकातून पाण्याचे फवारे बाहेर उधळले. संग्रामने पाण्याखाली डुबकी मारली, मत्स्यरूपा आणि नीलगंधा यांनी त्याचे अनुकरण केले. सागराच्या पृष्ठभागाखाली दहा मीटर खोलीवर त्यांनी पोहायला सुरवात केली ! त्या बेटाच्या परिसरामधल्या उथळ पाण्याकडे !

त्या खोलीवर सागराचे किरण पाण्यात सगळीकडे पसरले होते. दूरवर बेटाच्या किनाऱ्यावर आपटून फुटणाऱ्या लाटांचे पडसाद ऐकू येत होते.

शिकारी जहाजाचे पंखे आता जास्तीत जास्त गतीने फिरू लागले.

जहाजाच्या पुढच्या भागाखालून पाण्याचे प्रचंड फवारे दोन्ही बाजूला उडू लागले. जहाजाच्या इंजिनाची वाढलेली घरघर ऐकून संग्रामला परत भीतीने ग्रासले. त्याने अगोदरच बेटाच्या दिशेने पोहायला सुरवात केली नसती तर ते जहाज त्यांच्याजवळ आले असते.

आणि मग संग्राम किंवा मत्स्यरूपा यांच्या रुंद पाठी पाण्याबाहेर दिसल्या असत्या. फक्त दोनचार क्षणांसाठी ! आणि तेवढा अवधी जहाजावरच्या बंदुकीमागे उभ्या असलेल्या खलाशाला बरची झाडण्यासाठी पुरेसा होता.

पण त्या जहाजाची बांधणी अगदी वेगळी होती. जगातल्या सर्वात गतिमान देवमाशाला पकडण्याचे सामर्थ्य त्या जहाजात होते. त्याची इंजिने अत्यंत शक्तिमान होती. कोणत्याही देवमाशाला थकविण्याची ताकद त्याच्यामध्ये होती.

जहाजाने पूर्ण गतीने पाणी कापायला सुरवात केली. संग्रामचे कुटुंब आणि जहाजामधले अंतर कमी कमी होऊ लागले.

सर्वात अगोदर नीलगंधा दमली. अजून लहान होती ना ती ! ती पाण्याच्या पृष्ठभागावर उसळली. तिथे तिच्या मस्तकातून दोनदा पाण्याचे फवारे उफाळले. मग तिने परत सागराच्या पृष्ठभागाखाली डुबकी मारली.

संग्रामला जहाजाच्या इंजिनाचा आवाज आता अगदी जवळ ऐकू येऊ लागला. त्याने मत्स्यरूपेला साद घातली. आता संग्राम आणि मत्स्यरूपा दोघेही नीलगंधेला आर्जवू लागले. पण नीलगंधेला त्यांच्या बरोबरीने पोहणे कसे शक्य होते ?

इंजिनाचा भेडसावणारा आवाज फारच जवळ आला. बेटाच्या किनाऱ्यावरचे उथळ पाणी अजूनही दूर होते.

संग्रामला काहीतरी करून जहाजाचे लक्ष आपल्याकडे वेधून घ्यायचे होते. तेवढ्या वेळात मत्स्यरूपा आणि नीलगंधा बेटाजवळ पोहोचल्या असत्या

त्याने एकदा आक्रमणाची गर्जना ठोकली. त्याच्या मस्तकातून पाण्याचा भव्य फवारा हवेत उफाळला. मग तो पाण्यामध्ये आडवा झाला. त्याची कूस जहाजावरच्या खलाशांना दिसू लागली.

पण बंदुकीमागे उभा राहिलेला खलाशी अनुभवी होता. आपल्या जीवनाची कित्येक वर्षे त्याने देवमाशांची शिकार करण्यात घालवली होती. देवमाशांच्या या फसव्या युक्तीची त्याला कल्पना होती. त्याने संग्रामची शिकार केली असती तर मत्स्यरूपा त्याच्या हातातून निसटली असती. त्याला आधी मत्स्यरूपेची शिकार करायची होती. संग्राम तिच्या पाठोपाठ जहाजाच्या आसपास परतणार हे त्याला माहीत होते. मग संग्रामचीही शिकार होणार होती.

म्हणूनच आता त्याने संग्रामकडे पूर्णतः दुर्लक्ष केले. आणि आपले सर्व ध्यान मत्स्यरूपेवर केंद्रित केले.

जहाजाने किनाऱ्याकडे जाणाऱ्या त्या दोघांच्या दिशेने आपली वाटचाल सुरूच ठेवली.

संग्रामने जवळजवळ अर्धा मीटर अंतर कापले. मग त्याला जहाजाच्या इंजिनाचा आवाज अगदीच कमी ऐकू येऊ लागला. त्याने ओळखले की आपली फसगत झाली आहे. तो आता मत्स्यरूपा आणि नीलगंधा यांच्यापासून जवळजवळ एक किलोमीटर अंतरावर होता. त्या अजूनही उथळ पाण्यात पोहोचल्या नव्हत्या. जहाज अजूनही त्यांचा पाठलाग करत होते.

संग्रामने जहाजाच्या आवाजामधली भयानकता ओळखली. जहाज मत्स्यरूपेचा पाठलाग करते आहे हे त्याने जाणले. दहा-पंधरा सेकंदांतच जहाज मत्स्यरूपेच्या जवळ पोहोचणार होते. आणि तो तिच्यापासून कितीतरी दूर होता.

संग्रामने संतापाने एक प्रचंड गर्जना केली. त्याच्या मस्तकातून पाण्याचा उंच फवारा उफाळला. आणि मग तो सर्व शक्तिनिशी अतिशय वेगाने जहाजाच्या दिशेने फरफरू लागला.

जहाजावरच्या खलाशांनी त्याची गर्जना ऐकली. ते आश्चर्यचकित

झाले, आपली कामे सोडून संग्रामला पाहण्यासाठी जहाजाच्या डेकवर जमा झाले. त्यांनी त्याचे ते काळसर, प्रचंड धूड पाहिले. जहाजाच्या दिशेने सर-सरणारे ! जणू त्या जहाजाचा खातमा करण्यासाठी निसर्गाने निर्माण केलेला एक प्रचंड टोर्पेडोच होता तो !

एक क्षणभरही गती कमी न करता, एकदाही श्वास न घेता, संग्राम बघता बघता जहाजाजवळ पोहोचला. खलाशांचे डोळे विस्फारले. त्यांच्या काळजात भीतीची कळ उठली.

संग्राम जहाजाच्या अगदी जवळ आला. मग त्याचे प्रचंड, बलाढ्य शरीर पाण्यावर उसळले. खलाशांना तो पूर्णतः अगदी स्पष्ट दिसला. तो अफाट देह ! ते मांसल, रुंद पंख ! मोठाले, वक्र शेपूटपंख आणि त्याच्या पाठीवरचाही तो माणसाहूनही उंच, सरळताठ, शक्तिमान पंख !

आणि दुसऱ्याच क्षणी संग्रामने आपले सर्व सामर्थ्य एकवटून जहा-जाच्या बगलेमध्ये जोरदार धडक मारली.

जहाजावरचे खलाशी इकडे तिकडे आपटले. त्यांची पांगापांग झाली. संग्रामच्या जबरदस्त धडकीमुळे सगळे जहाज भूकंप झाल्याप्रमाणे हादरले.

पण संग्राम कितीही शक्तिमान असला तरी त्या जहाजाचे काय नुक-सान करू शकणार होता? ते प्रचंड जहाज बर्फाचे लगदे फोडून सागरप्रवास करण्यासाठी बांधले गेले होते. ताशी पासष्ट किलोमीटर गतीने आलेल्या संग्रामच्या धडकीने जहाजाला काहीही झाले नाही. उलट संग्रामच सागरावर फेकल्या गेलेल्या पिपासारखा बाजूला भिरकावला गेला.

संग्राम त्याच्या मस्तकामधल्या वेदनांनी क्षण दोन क्षण दिङ्मूढ झाला. तो एका कुशीवर पडला मग त्याच्या मेंदूमध्ये उठलेल्या वेदनेची तीव्रता कमी झाली. आता वेदनेची जागा संतापाने घेतली.

त्याने आपले शेपूटपंख झटकले. तो परत पाण्यात सरळ ताठ झाला. त्याने आपल्या शरीरातला प्रत्येक स्नायू ताठ केला. त्याने आपली सर्व शक्ती एकवटली.

जहाज अजूनही मत्स्यरूपेचा पाठलाग करतच होते.

संग्रामने परत एकदा जहाजाच्या दिशेने भरभरायला सुरवात केली.

जहाजावरच्या खलाशांनी परत त्याचे अजस्त्र धूड बघितले. डेकवर खलाशांची झुंबड उडाली. त्यांनी इतका बलाढ्य, गतिमान शिकारी देवमासा कधीच बवितला नव्हता. संग्रामने जहाजावर धडक मारली होती. त्या धक्क्यातून तो सावरला होता. आणि परत तितक्याच वेगाने आता जहाजाकडे सरसरत होता.

संग्रामने परत एकदा जहाजावर धडक मारली. जहाज दुसऱ्यांदा हादरले. संग्रामच्या मस्तकात वेदनांचा कल्लोळ उसळला.

जहाजाचा कॅप्टनही डेकवर येऊन संग्रामला पाहात होता. तो धावतच जहाजाच्या पुढच्या बाजूला गेला. त्याने बंदुकीमागे उभ्या राहिलेल्या खलाशाला संग्रामची शिकार करायला सांगितले.

किनारा आता अगदीच जवळ आला होता. आठ–दहा क्षणांतच मत्स्यरूपा आणि नीलगंधा उथळ पाण्यात शिरणार होत्या. अंधार पडायलाही सुरवात झाली होती. मत्स्यरूपेची शिकार करणे आता अवघड नव्हते. पण मग अंधारामुळे संग्रामसारखा अद्वितीय नरशिकारी हातून निसटला असता.

जहाजाच्या अनुभवी कॅप्टनने ते जाणले होते. काही झाले तरी संग्रामची शिकार करायचीच असा त्याने निश्चय केला होता.

वेळ फारच थोडा होता. फक्त सात–आठ क्षण!

संग्राम त्याच्या दुसऱ्या धडकीतून सावरला होता. त्याला कळून चुकले होते की जहाजावर धडकी मारण्याचा काही उपयोग नव्हता. शिवाय किनारा आता अगदी जवळ आला होता.

संग्रामने जहाजाला ओलांडून किनाऱ्याच्या दिशेने सरसरायला सुरवात केली. पण सरळ सरळ नाही ! वेडयावाकडया मुसंडया मारत ! तुफान वेगाने !

जहाजाच्या बंदुकीमागे उभ्या असलेल्या खलाशाने नेम धरला. आदल्या दिवशी त्याचा नेम दोनदा हुकला होता. आज तसे होऊन चालणार नव्हते.

शिवाय जहाजाचा कॅप्टन स्वत: त्याच्या मागे उभा होता. जहाजावरच्या प्रत्येक खलाशाचे लक्ष त्याच्यावर खिळले होते.

त्याने संग्रामच्या रुंद पाठीवर बंदूक स्थिर केली. बंदुकीचा चाप ओढला

संग्राम, मत्स्यरूपा आणि नीलगंधा– तिघांनीही बंदुकीचा धडाका ऐकला, बरचीचे टोक फुटण्याचा स्फोट ऐकला.

संग्रामच्या शरीरातून रक्ताचा लोट उफाळला. त्याच्या चारी बाजूंना नायलॉनचे दोर पाण्यात आपटले.

मत्स्यरूपा आणि नीलगंधा आता बेटाच्या किनाऱ्यावरच्या उथळ पाण्यात पोहोचल्या होत्या. त्या सुरक्षित होत्या.

संग्रामला त्याच्या कुशीमध्ये एक भयंकर वेदना जाणवली. मग त्याने एक जोरदार मुसंडी मारली.

जहाज आता उथळ पाण्यापर्यंत पोहोचले होते. जहाजाच्या कॅप्टनने जहाज थांबवायचा आदेश दिला. त्याहून पुढे जाणे म्हणजे जहाज गमावणे होते.

परत एकदा जहाजाच्या बंदुकीमागे उभ्या असलेल्या खलाशाचा नेम हुकला होता.

बंदुकीमधून निघालेली बरची संग्रामच्या कुशीत थोडीशीच घुसली होती. अगदी शेवटच्या क्षणी संग्रामने मुसंडी मारल्यामुळे तसे घडले होते. बरचीच्या टोकाचा स्फोट झाला होता. पण तिच्यातून बाहेर पडलेल्या काटेरी तारांनी फक्त संग्रामची बगल खरडून काढली होती.

संग्रामही आता उथळ पाण्यात आला होता. मत्स्यरूपा लगबगीने त्याची जखम न्याहाळत होती. त्याला साद घालत होती. नीलगंधा ते रक्त पाहून भीतीने थरथरत होती.

शिकाऱ्यांची शिकार करणाऱ्या जहाजाने किनाऱ्यापासून काही अंतरावर खोल पाण्यात नांगर टाकला होता. दुसऱ्या दिवशी सकाळी हेलिकॉप्टर

बोलावून परत संग्रामचा पाठलाग करण्याचा निर्णय जहाजाच्या कॅप्टनने घेतला होता.

जहाजावरचा बंदूक झाडणारा खलाशी स्वत:वरच संतापला होता. चरफडत होता.

त्या रात्री सागराला ओहोटी लागली. पण त्या पूर्वीच अंधाराचा फायदा घेऊन संग्राम आपल्या कुटुंबानिशी तिथून सटकला. किनाऱ्यावरच्या खडकांना वळसे घालत ते जहाजापासून दूर गेले. मग त्यांनी खोल सागराकडे पोहायला सुरवात केली.

संग्रामने मागे वळून पाहिले. दूरवर त्याला जहाजाची आकृती दिसली. त्याने मत्स्यरूपा आणि नीलगंधा यांना मागोमाग पोहण्याचा आदेश दिला.

थोड्याच वेळात किनाऱ्यावरच्या खळबळत्या लाटांचे आवाज मागे पडले. त्याची जागा खोल सागरामध्ये उफाळणाऱ्या प्रचंड लाटांच्या दुमदुमाटाने घेतली.

संग्रामने उत्तरेला ब्रिटनच्या दिशेने पोहायला सुरवात केली. मत्स्यरूपा आणि नीलगंधा त्याच्या मागोमाग पोहू लागल्या.

संग्रामने सागरसंग्रामाचा एक नवा धडा आता घेतला होता. त्याने आता सागरावर आढळणाऱ्या प्रत्येक जहाजाच्या आवाजाकडे, एकाग्र चित्ताने लक्ष देण्याचा निश्चय केला – तो आवाज ऐकताच तिथून दूर जायचे ! शक्यतो उथळ पाण्यात !

तो आवाज मृत्यूचा संदेश आहे हे त्याच्या तल्लख मेंदूने जाणले होते.

जहाजाने त्याला पाहण्यापूर्वी जहाजाचा आवाज त्याला ऐकायचा होता. हेलिकॉप्टरचा आवाज ऐकताच खोल पाण्यात डुबकी मारून किनारा गाठायचा होता

उत्तरेकडचा सागराचा तो भाग शीतल आणि आल्हाददायक होता. पूर्वेला सागरावर उठलेल्या हेब्रिडेसच्या टेकड्या दिसत होत्या. थोड्याच दिवसांत स्कॉटलंडच्या बेटांवरचे आवाज आणि गंध संग्राम आणि त्यांच्या

कुटुंबाच्या मस्तकामध्ये भिनू लागले.

संग्रामच्या बगलेतली जखम आता बरी झाली होती. त्याला आता त्याचे घर सापडले होते.

रात्र पडली होती. सागर झोपी गेला होता. पण सागराच्या पृष्ठभागाखाली चित्रविचित्र आवाज ऐकू येत होते. जलवनस्पतींच्या जंगलातून पाण्याचे प्रवाह वहात होते माशांचे थवेच्या थवे सळसळत होते. कुठे एखादा लॉब्स्टर प्रवाळावर ओरखडे काढत होता. तर कुठे एक मोठाला खेकडा खडकांवर पाय आपटत चालला होता. देवमाशांनी आणि डॉलफिननी सोडलेल्या सुरेल आणि सूक्ष्म ध्वनितरंगांचे जाळे सागराच्या काळजामध्ये पसरले होते.

एकटा संग्राम रात्रभर जागा होता. पण त्याचे मन शांत होते. त्याने हळूहळू आकाशामध्ये चमचमणाऱ्या ताऱ्यांना पाहून आपण सागराच्या कोणत्या भागात आहोत हे निश्चित केले. आपण घरी परतलो आहोत हे त्याच्या लक्षात आले.

त्याच्या जीवनाचा चित्रपट त्याच्या मनामध्ये सरकू लागला. इथेच त्याच्या जीवनाची सुरवात झाली होती. इथेच त्याचा जन्म झाला होता. इथेच त्याने आपले बालपण घालवले होते. आणि इथेच हिंमतला – त्याच्या पित्याला – मृत्यूने हिरावून नेले होते.

त्यानंतर त्याने हजारो किलोमीटरचा सागरप्रवास केला होता.त्याच्या जीवनात नवे मित्र आले होते. आणि नंतर हरवले होते. त्याची आई त्याला दुरावली होती. त्याची पहिली प्रियतमा त्याला कायमची सोडून गेली होती.

आणि मग मत्स्यरूपेने त्याला मृत्यूच्या जबडयातून सोडवून आणले होते. ती त्याची जीवनाची साथीदारीण बनली होती. सखी बनली होती. त्यांच्या प्रेमाचे प्रतीक म्हणून नीलगंधेने जन्म घेतला होता. संग्राम आता त्या दोघींना घेऊन आपल्या जुन्या घरी आला होता.

संग्रामने आणि त्याच्या कुटुंबाने सागराच्या त्या भागात जवळ जवळ

एक महिना घालवला. आणि मग जून महिन्याच्या अखेरीस त्यांच्या आस-पासच्या सागरामधल्या सर्व जलचरांनी तिथून पलायन केले. त्यांना कळून चुकले होते की शिकारी तिथे आले होते. आणि त्यांच्या आसपास राहणे म्हणजे मृत्यूला आमंत्रण देण्यासारखे होते.

संग्रामला आता भक्ष्याची कमतरता जाणवू लागली. त्याने सागराच्या त्या भागातून जाण्याचे ठरवले. तो मत्स्यरूपा आणि नीलगंधा यांना बरोबर घेऊन खोल सागराकडे वळला. ते प्रथम पश्चिमेला गेले. नंतर त्यांनी आग्नेय दिशेला जायला सुरवात केली. सागराचे उष्ण प्रवाह त्यांना तिकडे ढकलू लागले.

संग्रामच्या जुन्या घरात घालवलेल्या काळामध्ये मत्स्यरूपा लठ्ठ आणि आळशी झाली होती. तिच्या पोटात नवे बाळ होते. आता उघडया सागरा-मध्ये तिने पोहण्याचे बंद केले. ती सागरप्रवाह आणि भरती ओहोटीच्या लाटा तिला नेतील तिकडे जाऊ लागली. त्या बाळासाठी तिला विश्रांती घेणे आवश्यक होते.

शिकार करण्याचे काम आता संग्रामच एकटयाने करू लागला. नील-गंधेला शिकार करायला शिकवू लागला.

एका दुपारी वादळाने सागरावर हैदोस घालायला सुरवात केली. त्याच दुपारी मत्स्यरूपेने एका नव्या बाळाला जन्म दिला.

त्याचे नाव होते साहस !

वादळाचा जोर ओसरेपर्यंत संग्राम आणि मत्स्यरूपा यांनी साहसला आपल्यामध्ये धरून ठेवले. ते लाटांच्या शिखरावर एकत्र चढू लागले. आणि मग लाटांच्या उतरणीवरून सागरामध्ये परत कोसळू लागले. पण त्यांनी साहसला वादळाची जाणीव सुद्धा होऊ दिली नाही.

शेवटी वादळ संपले. सागर शांत झाला. मत्स्यरूपा आपल्या बगलेवर उपडी झाली. साहसने आपले पहिलेवहिले दुग्धपान केले.

संग्राम आपल्या कुटुंबाला घेऊन परत पश्चिमेच्या दिशेने वाटचाल

करू लागला.

नीलगंधेने आता तारुण्यात प्रवेश केला होता. तिची शारीरिक वाढ पूर्ण झाली होती. ती आपल्या आईसारखीच देखणी झाली होती.

साहस नेहमी मत्स्यरूपेला चिकटून असे. पण मत्स्यरूपा खोल पाण्यात शिकारीसाठी जाऊ लागली की तो नीलगंधेबरोबर खेळत राही. नीलगंधा पुढेपुढे पोहत जाई. त्यावेळी साहस तिची शेपटी चावण्याचा प्रयत्न करत असे.

नीलगंधेच्या प्रचंड आकाराच्या मानाने तो अगदी इटुकला भासे.

पण काही दिवसांनी तिला साहसबरोबर खेळण्याचा कंटाळा येऊ लागला. ती मध्येच खेळायचे सोडून देऊ लागली. ती एकदमच खोल समुद्रामध्ये डुबकी मारू लागली. सागराच्या हृदयामधून येणारा आवाज एकाग्र चित्ताने ऐकू लागली. कधी कधी एकटेपणाची साद घालू लागली.

संग्राम आणि मत्स्यरूपा यांनी नीलगंधेमध्ये झालेला फरक ओळखला. तेही तिला साद घालू लागले. तिला आनंद वाटावा म्हणून! अगदी प्रेमाने! पण आपल्या माता-पित्यांच्या आवाजामध्ये नीलगंधेला स्वारस्य वाटेनासे झाले तिचे कान एक वेगळीच साद ऐकण्यासाठी आसुसले होते.

नीलगंधा आता खवळलेल्या सागराप्रमाणे बेचैन होऊ लागली. ती पोहताना अगदी मागे मागे रेंगाळू लागली. तिने साहसशी खेळणे जवळजवळ बंदच करून टाकले.

तिच्या पोटामध्ये आगळेच स्फुल्लिंग उडू लागले. स्कॉटलंडच्या किनाऱ्यावरच्या सागराच्या भागातून दूर जाण्यासाठी तिचे मन धडपडू लागले.

एके दिवशी तिने संग्रामबरोबर शिकारीसाठी डुबकी मारली. त्यांना स्क्विडचा थवा मिळाला. त्यांनी त्या थव्याचा फडशा पाडला. मग नीलगंधा संग्रामला खोल पाण्यातच सोडून सागराच्या पृष्ठभागावर आली.

मत्स्यरूपा लाटांच्या हिंदोळ्यावर साहसला खेळवत होती. तिने नीलगंधेला वर येताना पाहिले. त्या दोघींमध्ये गुजगोष्टी झाल्या. मत्स्यरूपेने नीलगंधेचे मनोगत जाणून घेतले.

संग्राम अजूनही खोल पाण्याच्या अंधःकारातच शिकार करत होता.

मग नीलगंधेने साहसला आपल्याजवळ बोलावले. त्याला आपल्या नाकाने गुदगुल्या केल्या. तिने त्याला थट्टेने सांगितले – 'चल, शीव माझी पाठ !' आणि मग ती खोल सागराच्या दिशेने सरसरू लागली.

मत्स्यरूपा ते सगळे पाहातच होती. तिचे हृदय मायेने भरून आले.

साहसने नीलगंधेची पाठशिवणी करण्याचा प्रयत्न केला. पण त्या दिवशीचा पाठशिवणीचा खेळ लुटुपुटीचा नव्हता. साहस थकून परतला. मत्स्यरूपेला चिकटला. नीलगंधा फरफरत दूर दूर जाऊ लागली.

मत्स्यरूपेने संग्रामला साद घातली. तो सागराच्या पृष्ठभागावर उफाळला. काय घडले होते ते त्याने मत्स्यरूपेच्या शब्दांनी जाणून घेतले. नीलगंधा मोठी झाली होती. तिने आपला वेगळा मार्ग धरला होता.

संग्राम, मत्स्यरूपा आणि साहस टक लावून दूरवर जाणाऱ्या नील–गंधेच्या आकृतीकडे पाहात राहिले. थोड्याच वेळात ती दिसेनाशी झाली. आणखी काही वेळानंतर संग्राम आणि मत्स्यरूपा यांच्या प्रतिध्वनींचा वेध घेणाऱ्या यंत्रणांनाही तिचे आवाज ऐकू येईनासे झाले.

संग्रामने मत्स्यरूपा आणि साहस यांना नीलगंधेच्या उलट दिशेला पोहायचा आदेश दिला.

त्यानंतर नीलगंधा त्यांना परत कधीच भेटली नाही.

तिने आपला सागरसंग्राम एकटीने सुरू करण्याचा निर्णय घेतला होता – तिला तिचा मनपसंत नरशिकारी भेटेपर्यंत !

□

# ॥ अकरा ॥

संग्राम आणि त्याच्या कुटुंबाचे सागरभ्रमण सुरूच होते.

सागराच्या पृष्ठभागाजवळ पाणी ऊबदार असते. काही खोलीवर पाणी थंडगार होऊ लागते. या पाण्याच्या दोन स्तरांच्यामधले पाणी अगदी संथ असते.

एके दिवशी त्या संथ पाण्यामधून नरशिकारी देवमाशाची साद संग्रामला ऐकू आली. ती साद इतकी हळूवारपणे आली होती की मत्स्यरूपेच्या तीक्ष्ण कानांनाही ती ऐकू आली नाही.

संग्रामने मत्स्यरूपेला आणि साहसला गप्प राहाण्याचा आदेश दिला. मग तो अगदी एकाग्र होऊन ती साद परत येण्याची वाट पाहू लागला.

दोन-तीन मिनिटांनी संग्रामला परत एकदा ती साद अगदी अस्पष्ट ऐकू आली. त्या सादीमागची आर्तता त्याने ओळखली. त्याने आपल्या नाकाने मत्स्यरूपेच्या बगलेला स्पर्श केला. तिला आणि साहसला आपल्या मागोमाग येण्याचा आदेश दिला.

त्याने त्या सादीच्या दिशेने पूर्वेला पोहायला सुरवात केली. मत्स्यरूपा आणि साहस त्याच्या मागोमाग सरसरू लागले

संग्राम पाण्यामध्ये तीनदा थांबला. त्याने ध्वनितरंग बाहेर सोडले. त्यांच्या प्रतिध्वनींचा मागोवा घेतला. त्या सादीची दिशा आणि अंतर निश्चित केले. मग त्याने परत पोहायला सुरवात केली.

मग तो एकदम थांबला. त्याच्या कानांना एक प्रचंड धूड त्याच्याच दिशेने पोहत असल्याचे ऐकू आले. मत्स्यरूपा आणि साहसही थांबले. त्यांना काय होते आहे हेच समजले नव्हते.

त्या धुडाचा पाण्यामध्ये फरफरताना होणारा आवाज वाढतच गेला. अर्ध्या एक मिनिटात त्या आवाजाने आसपासचे सागराचे पाणी दुमदुमू लागले.

संग्राम अगदी निस्तब्ध आणि निःशब्द होता. मत्स्यरूपा आणि साहस यांच्या मनातल्या कुतूहलाची जागा आता भीतीने घ्यायला सुरवात केली होती.

त्यांनी समोर पाहिले. निळ्याशार पाण्यातून येणारा एक महाकाय नरशिकारी त्यांना दिसला. त्याच्या शरीराची कातडी सुरकुतली होती. तिला अधूनमधून भेगा पडल्या होत्या. जिकडे पहावे तिकडे जखमांचे व्रण दिसत होते. त्याच्या जबड्यामध्ये एकदोन सुळेच होते. त्याचे डोळे अगदी थकलेले आणि निस्तेज होते. त्याची ती बलाढ्य वक्र शेपटी मधोमध फाटली होती. अगदी निर्जीवपणे त्याच्यामागे लोंबकळत होती. त्याच्या पाठीवरच्या प्रचंड पंखाचा चेंदामेंदा झाला होता. तो अगदी मधोमध, पूर्णतः फाटला होता. एका बाजूला लवंडला होता.

तो नरशिकारी विशाल होता !

संग्राम विशालच्या कळपात एक तरुण नरशिकारी म्हणून होता. तेव्हा कित्येकदा तो विशालच्या नजरेला नजर भिडवी. त्याच्या डोळ्यांतून बंडखोरीचे स्फुलिंग उडत.

संग्रामने विशालच्या डोळ्यांत पाहिले. पण संग्रामच्या डोळ्यांतले भाव आता वेगळेच होते.

संग्रामने विशालच्या कळपाकडे पाठ फिरविल्यानंतर कित्येक वर्षे उलटली होती. त्या काळामध्ये संग्रामने सागराच्या अंतरंगामध्ये दडलेल्या अनेक रहस्यांचा भेद केला होता. तो आता सागरसंग्रामामधला एक अनुभवी

आणि शक्तिमान योद्धा बनला होता.

पण संग्राम विशालच्या कळपाबरोबर घालवलेले दिवस कधीच विसरू शकला नव्हता. ते मित्र ! ते लांब लांबचे जलप्रवास ! सागरसंग्रामकडे विशालने दिलेले धडे !

विशालकडून संग्राम बरेच शिकला होता. आणि त्या शिकवणीमधला सगळ्यात मोठा धडा होता– नेतृत्वाचा ! शिकारी देवमाशांचा म्होरक्या म्हणून हुकमत गाजवण्याचा !

आता तोच विशाल मृत्यूच्या मार्गाला लागला होता. सागरसंग्राम-मध्ये तो विजयी ठरला होता. पण निसर्गाच्या नियमाचे पालन करणे त्यालाही अपरिहार्य होते.

पण तो संग्रामकडे का आला होता ?

आदल्या दिवशी संध्याकाळीच विशालला कळून चुकले होते की आपली शक्ती हळूहळू कमी होते आहे. त्याने आपला कळप कसाबसा स्कॉटलंडच्या किनाऱ्याजवळ आणला होता. संग्रामच्या जुन्या घराजवळ ! आणि मग त्याचा पूर्णतः शक्तिपात झाला होता. कळपामधल्या तीन तरण्याबांड नरशिकाऱ्यांनी एकत्र येऊन त्याला हाकलून लावले होते.

त्या तीन नरशिकाऱ्यांमधल्या एकातही कळपाला एकत्र ठेवण्यासाठी आवश्यक असलेली शक्ती आणि अनुभव नव्हता. आता विशालने एकत्रित केलेला प्रचंड कळप फुटण्याचा धोका निर्माण झाला होता. तसे घडले असते तर विशालचा सागरसंग्रामामध्ये दारुण पराभव झाला असता. त्याचे जीवन-भरचे कार्य व्यर्थ गेले असते. त्याला तसे होऊ द्यायचे नव्हते.

आणि म्हणूनच तो शोधीत होता एका नरशिकाऱ्याला ! विशालला माहीत होते तो नरशिकारीच त्या कळपाचा म्होरक्या बनू शकेल. त्याने कित्येक वर्षांपूर्वीच ते ओळखले होते. त्याच्या प्रयत्नांना यश आले होते.

विशालला संग्राम सापडला होता !

विशाल आणि संग्राम एकमेकाशी काहीच बोलले नाहीत. पण विशालने आपल्या डोळ्यांमधल्या भावांनी आपले मनोगत संग्रामला सांगून

टाकले. विशाल म्हणत होता, आपले काम आता संपले आहे ! संग्रामला समजले की आपले काम आता सुरू होणार आहे !

विशाल परत फिरला. अगदी मंदगतीने. निर्जीवपणे ! त्याने आलेल्या दिशेकडे पाहिले. अशक्तपणे आपली शेपटी उचलली. तो पोहू लागला. संग्रामने त्याच्या बरोबर पोहायला सुरवात केली.

विशालने सागरसंग्रामामधला शेवटचा विजय मिळवला होता. त्याचा सागरसंग्राम आता संपला होता !

मत्यरूपा आणि साहस यांना अजूनही काय चालले आहे हे समजले नव्हते ! ते गुपचूप विशाल आणि संग्राम यांच्या मागोमाग पोहू लागले. काही अंतर राखून !

विशालने त्याचे शेवटचे दीड किलोमीटर अंतर कापले. महत्प्रयासाने! त्याच्या कळपाबरोबर नाही, तर संग्रामबरोबर ! त्या नरशिकाऱ्याबरोबर जो एक दिवस आपल्या कळपाचे नेतृत्व करणार असे विशालला वाटले होते!

मग विशाल एकदम थाबला आणि त्याच्याबरोबरच संग्रामही ! विशालचे प्रचंड शरीर ओहोटीच्या लाटांमुळे थोडेसे कलले. त्याने एकवार संग्रामकडे पाहिले. त्यानंतर त्याचे शरीर सागराच्या प्रवाहाबरोबर जाऊ लागले. तो शेवटपर्यन्त एक शब्दही बोलला नाही.

संग्राम आता सागराच्या पृष्ठभागावरच होता. त्याने ओळखले की मृत्यूने विशालला हिरावून नेले होते. पण त्याला अजूनही वाटले की विशाल त्याच्या शेजारीच होता.

संग्राम विशालला कधीच विसरू शकणार नव्हता.

त्याने मत्स्यरूपा आणि साहस यांना थांबण्याचा आदेश दिला.

संग्रामने श्वास घेतला. एक जबरदस्त गर्जना केली. त्याच्या शरीरा-तला प्रत्येक स्नायू ताठ झाला. तो तुफान वेगाने पाण्याखाली फरफरू लागला.

संग्रामने वर पाहिले. विशालचा प्रचंड कळप पाण्यामध्ये रेंगाळत होता त्याने आपले नाक सरळ वर केले. तो सर्व शक्तिनिशी कळपाच्या

मधोमध उफाळला. त्याने कळपाला मागे टाकले. त्याचे भव्य शरीर पाण्याच्या पृष्ठभागावर हवेमध्ये उसळले. आणि मग परत पाण्यामध्ये कोसळले.

तो आता कळपाच्या अगदी मधोमध स्थिर झाला.

संग्रामभोवती पसरलेल्या कळपामधले शिकारी देवमासे गप्प झाले. त्यांचे डोळे संग्रामला निरखू लागले. त्याचा प्रचंड आकार ! ती रुंद पाठ! त्याचे मोठाले, वक्र बाजूपंख आणि शेपूटपंख ! त्याच्या पाठीवरला तो सरळताठ आणि बलाढ्य पंख! त्याच्या शरीरावर पसरलेले सागरसंग्रामामधले अनेक जखमांचे व्रण !

संग्रामने कळपातल्या प्रत्येक देवमाशाच्या नजरेला नजर भिडवली. आत्मविश्वासाने ! काहीशा उद्दामपणे !

कळपाने आपल्या म्होरक्याला ओळखले !

त्या कळपातल्या तीन तरुण नरशिकाऱ्यांनी संग्रामचे नेतृत्व स्वीकारायचे नाकारले. त्यांनीच आदल्या दिवशी वार्धक्यामुळे निर्दय झालेल्या विशालला कळपातून हाकलले होते.

त्यातल्या दोन नरशिकाऱ्यांनी बंडखोरीच्या गर्जना ठोकल्या. संग्रामवर चिडून हल्ले केले. संग्रामने एका नरशिकाऱ्याला हुलकावणी दिली. दुसऱ्याच्या बगलेमध्ये एक जबरदस्त धडक. त्या धडकेबरोबरच त्या नरशिकाऱ्याने संग्रामची शक्ती ओळखली आणि माघार घेतली.

तोपर्यंत तो पहिला नरशिकारी परत किंचाळत संग्रामवर चालून आला. संग्रामने परत त्याला हुलकावणी दिली आणि त्याच्यावर प्रतिहल्ला केला. त्याने त्याच्या शेपटीच्या मांसाचा एक भलामोठा तुकडा फाडून काढला. तो नरशिकारी वेदनेने चित्कारू लागला.

तो तिसरा नरशिकारी मात्र त्या झुंझीपासून अलिप्तच राहिला. तो आपल्या पराजित मित्रांहून आकाराने बराच मोठा आणि शक्तिमान होता. त्याने आपल्या मित्रांनी संग्रामवर केलेले हल्ले बघितले. संग्रामची ताकद आणि चातुर्य त्याने ओळखले. त्याने संग्रामवर हल्ला करण्याचा प्रयत्नच

केला नाही. त्याने संग्रामला फक्त एकवार त्याहाळून बघितले. मग त्याने कळपाकडे पाठ फिरवून पोहायला सुरवात केली.

त्याच्या दोन्ही जखमी मित्रांनी त्याच्या मागोमाग जायला सुरवात केली. त्याच्या मार्गामध्ये पाण्यात रक्ताचे लोट उफाळले.

संग्रामने आणि कळपाने त्या तिघांना दूरवर जाताना पाहिले. मग त्याचे आकार पाण्यामध्ये दिसेनासे झाले.

संग्रामने ओळखले की तो तिसरा नरशिकारी सर्वात धोकादायक होता. तो एकेदिवशी परतणार होता—महाकाय, बलाढ्य, अनुभवी होऊन!

संग्रामचा जीवनमार्ग आता निश्चित झाला होता. आता तो त्या प्रचंड कळपाचा म्होरक्या होता. त्या कळपातला प्रत्येक देवमासा नेतृत्वासाठी त्याच्यावर अवलंबून राहाणार होता. जर त्याच्याकडून म्होरक्या होण्यास अयोग्य असे काही घडले असते तर तो कळप पांगणार होता.

त्याने एकदा मानवी शिकाऱ्याच्या हातून आपले आणि आपल्या कुटुंबाचे प्राण वाचवले होते. पण सागराच्या प्रत्येक भागात शत्रू वावरत होते. संतापलेल्या स्पर्म जातीच्या देवमाशांचे प्रचंड जबडे पूर्ण वाढ झालेल्या शिकाऱ्याचे एकाच चाव्यात दोन तुकडे करू शकतात! प्रचंड स्क्विड आणि ईल शिकाऱ्यांना घुसमटवून बुडवू शकतात! सागराच्या तळावरचे धोकेबाज जहाजांचे सांगाडे शिकाऱ्यांना सापळ्यात धरू शकतात! शार्कमाशांचे थवे एकट्या पडलेल्या शिकाऱ्यांचे लचके तोडून त्याला ठार मारू शकतात. प्रवाह आणि उथळ पाणी सगळ्या कळपाचीच ओहोटीच्या वेळी नाकेबंदी करून त्यांना संपवू शकतात.

आता त्या सगळ्या शत्रूपासून कळपाचे रक्षण करण्याची जबाबदारी संग्रामची होती.

संग्रामने कळपामध्ये फिरायला सुरवात केली. तो प्रयेक देवमाशाजवळ गेला. त्याने त्यांना स्पर्श केला. त्यांचे आवाज ऐकले.

आणि मग त्याला हवे होते ते सापडले.

---

जलनिशेच्या डोळयांत संग्रामला तेच जुने ममतेचे भाव दिसले. त्याला माहीत होते की जलनिशा कळपात असणारच. ती आता थकली होती. तिने प्रेमभऱ्या नजरेने संग्रामला पाहून घेतले. डोळे भरून.

तिने त्याला जन्म दिला होता अटलांटिक महासागराच्या प्रत्येक कानाकोपऱ्यामध्ये त्याचे पालन पोषण केले होते. त्याची काळजी घेतली होती. जुन्या आठवणींचे ढग तिच्या मनात दाटून आले.

आणि आज, कित्येक वर्षांनी तिचा मुलगा तिच्याकडे परत आला होता. एक बलाढ्य नरशिकारी बनून ! त्या कळपाचा म्होरक्या बनून तिचे हृदय अभिमानाने उचंबळून आले.

सगळा कळप शांत झाला होता. फक्त संग्राम आणि जलनिशा एक-मेकाशी बोलत होते. त्यांचे शब्द दुसऱ्या कोणालाच समजत नव्हते.

संग्रामने साद घातली. मत्स्यरूपा आणि तिला भीतीने चिकटलेला साहस त्याला दिसू लागले. मत्स्यरूपा कळपामध्ये शिरली. तिने संग्राम-प्रमाणेच कळपामधल्या प्रत्येक देवमाशाला स्पर्श केला ती त्यांच्याशी कुज-बूजू लागली. तिच्या आवाजात मित्रत्वाची भावना फुलून आली होती.

कळपाने मोकळ्या मनाने जलनिशा आणि साहस यांना आपल्यात मिसळून घेतले.

सागरावर वाहणारी ऊबदार हवेची झुळूक आता अगदीच मंदावली होती. वरती आकाशामध्ये समुद्रपक्षी फडफडत होते. मावळणाऱ्या सूर्याचे अखेरचे किरण त्यांच्या शरीरांवर पडत होते. पश्चिमेचे क्षितिज केसरी रंगाने माखले गेले होते. सागरावर सगळीकडे सोनेरी रंग पसरला होता.

एक प्रचंड पंख सागराचा पृष्ठभाग फाडून दिमाखाने वरती उफा-ळला. पाण्यावर एक मोठाली धनुष्याकृती लाट पुढेपुढे धावू लागली.

संग्रामने एक भारदार गर्जना ठोकली. आणि सगळा सागर एकदम

शिकाऱ्यांच्या उफाळण्याच्या, फरफरण्याच्या, सरसरण्याच्या, झरझरण्याच्या आवाजांनी गलबलून गेला. संग्रामच्या आणि त्याच्या कळपातल्या प्रत्येक शिकाऱ्याच्या मस्तकातून पाण्याचे उंच फवारे एकत्रितपणे हवेत उफाळले. त्याचा आवाज सागराच्या पृष्ठभागावरल्या वातावरणात दुमदुमू लागला.

संग्राम उत्तरेकडे वळला. केप रॉथच्या दिशेने झरझरू लागला. त्याच्या कळपाने त्याच्या मागोमाग पोहायला सुरवात केली.

पश्चिमेला सूर्य क्षितिजाआड दिसेनासा झाला. आकाशामध्ये पसरलेला तांबूसपणा हळू हळू दिसेनासा झाला. सागरावर निशेने अंधःकाराचे पांघरूण घालायला सुरवात केली. आकाशामध्ये रात्रीचे पहिलेवहिले तारे दिसू लागले.

संग्रामचा सागरसंग्राम परत सुरू झाला.

□ □

" 'सागरसंग्राम' ही शिकारी देवमाशाची चित्तथरारक कथा आहे. लेखक मेजर अरविंद पाटील यांनी एक आगळा आणि वेगळा विषय ललितरम्य शैलीत रंगविलेला आहे. देवमासा हा 'मासा' नव्हे तो निसर्गाने निर्मिलेला एक अद्भूत जलचर सस्तन प्राणी आहे. या विशाल आकाराच्या आणि प्रचंड ताकदीच्या प्राण्याच्या पाण्याखालील जीवनाचा इथे लेखकाने वेध घेतलेला आहे आणि त्यातूनच 'जीवनसंग्राम' ही शिकारी देवमाशाची ललित रम्य तरीहो हृदयस्पर्शी जीवनकहाणी साकार झाली आहे. यातील हिंमत, संग्राम, जलनिशा. मत्स्यरूपा, नीलगंधा इ. जलचर ही मानवी प्रतिरूपे वाटावीत इतक्या हळूवारपणे लेखकाने त्यांचे 'जीवनाखालचे जीवन' रंगविले आहे. त्यांचे राग-लोभ. त्यांचे विरह-प्रणय, त्यांचे मीलन, त्यांच्या ईर्षा. त्यांची झुंजार वृत्ती यांचे मनोज्ञ दर्शन या कहाणीत घडविण्यात आलेले आहे."